# महाभारत अभंगवृत्तात

रचयिता



**श्रीपाद लक्ष्मण अभ्यंकर, मुंबई**

**(रचना २००७, आर्चाईव्ह-वर अपलोड २० सप्टेंबर २०२३)**

नमो गजानना | नमो व्यासमुने | वंदन भारत | ग्रंथासही -१-
ग्रंथाने उच्छिष्ट | केले सारे जग | माझा हा प्रयास | उच्छिष्टचि -२-
गीताप्रेस यांचे | संस्कृत मधील | संग्रही आहेत | ग्रंथ जरी -३-
वाचाया मिळाला | सुटसुटीतसा | ग्रंथ विल्यम बक् | साहेबांचा -४-
वाचनानंतर | ग्रंथाचा त्या केला | प्रथम सारांश | इंग्रजीत -५-
सारांश वाचून | केले अनुमान | कथा समजते | काय बरी -६-
मग सारांशाचा | केला मराठीत | गद्य अनुवाद | लगोलग -७-
मध्यंतरी पहा | लकब जमली | अभंगवृत्तात | लिहिण्याची -८-
त्याच लकबीने | मांडायाची आहे | महाभारताची | कथा आतां -९-
तसे तर पहा | महाभारताच्या | गोष्टी असतात | माहितीच्या -१०-
परंतु त्या गोष्टी | बहुधा तुटक | आपापल्या रीती | असतात -११-
मजा आगळीच | येईल वाटते | सलगपणाने | वाचतांना -१२-

**(१)**

निमिष वनांत | शौनक मुनींचे | आश्रमांत मित्र | सूत आले -१-
शौनकांना त्यांचे | वाटले गुंतले | मन कुठेतरी | रेंगाळले -२-
सूतांनी म्हटले | राजदरबारी | इतिहास मोठा | ऐकला ना -३-
जनमेजयाचे | दरबारामध्ये | स्वतः आले होते | व्यासमुनी -४-
महाभारताची | कथा ऐकवावी | प्रार्थना राजाने | त्यांना केली -५-
व्यासांच्या आज्ञेने | वैशंपायनांनी | कथा दरबारी | निरूपिली -६-
खरे तर सारा | इतिहास मोठा | व्यासांनी शिस्तीत | जुळविला -७-
तीन वर्षांची ती | सारी मेहनत | लिहाया मदत | हवी होती -८-
तेव्हा पाराशरे | श्रीगणेशालाच | लेखनिक होण्या | राजी केले -९-
अट परी एक | गणेश बोलले | लेखणी थांबावी | लागूं नये -१०-
व्यासांनी लगेच | आपलीही अट | तेव्हा सांगितली | गजानना -११-
सांगेन मी जे जे | तयाचा संपूर्ण | अर्थ ध्यानी घ्यावा | मग लिहा -१२-
गणेशास तेव्हा | स्वतःचीच खोड | जन्मापासूनची | आठवली -१३-
आज्ञाही विवेक | ठेऊनी पाळावी | समज नव्हती | बाळपणी -१४-
पार्वतीमातेने | भस्म लिंपुनिया | मूरत तयार | माझी केली -१५-
मूर्तीत ओतून | जीव महादेव | निघूनीया गेले | अरण्यात -१६-
स्नानाला जाताना | मातेने मजला | द्वारपालकामी | बजावले -१७-
स्नान करूनी मी | परत येईतो | प्रवेश कुणास | नको देऊं -१८-
अचानक आले | स्वतः महादेव | मला ना माहीत | हे तो कोण -१९-
त्यांनाही मज्जाव | करूनी तयांचा | राग अनावर | ओढवीला -२०-
क्षणार्धात त्यांनी | त्रिशूळाने माझा | करूनी टाकीला | शिरच्छेद -२१-
दृश्य पाहूनिया | मायही चिडली | शंभूंनी गणांना | आज्ञा केली -२२-

पहिले प्रथम । कोणते जे शीर । मिळेल आणावे । लगोलग -२३-
गणांना मिळाले । हत्तीचे मस्तक । तेच बसविले । धडावरी -२४-
पुन्हा ओतीयेला । प्राण मूर्तीमधे । तेव्हापासूनी मी । गजानन -२५-
हंसत व्यासांनी । म्हटले गणेशा । संपूर्ण विवेक । आता हवा -२६-
वेळोवेळी व्यास । जुळवीती शब्द । गणेशास मग्न । करणारे -२७-
तेवढी उसंत । व्यासांनाही मिळे । पुढील रचना । जुळविण्या -२८-
सूत शौनकाना । म्हणाले जो कोणी । ऐकेल हा सारा । इतिहास -२९-
कर्मपाशातून । त्याचीही सुटका । होईल निश्चित । समजावे -३०-
शौनकानी तेव्हा । करीत आग्रह । सूताना म्हटले । तरी मग -३१-
इथेच राहून । सारा इतिहास । ऐकविण्या व्हावे । कृपावंत -३२-

**(२)**

सूतांनी प्रथम । आठव दिधला । क्षीरसागराचे । मंथनाचा -३३-
प्रस्ताव तो होता । देवांसी मांडीला । स्वयें नारायणें । आदिकाळी -३४-
सागरमंथन । करीता मिळेल । रत्नमाणकांचे । भंडारचि -३५-
विशेष म्हणजे । मिळेल अमृत । देवांना प्रस्तावी । रस आला -३६-
मंदार पर्वत । सागरीं टाकला । घुसळाया रवी । त्याची केली -३७-
वासुकीचे मग । मन वळविले । दोराचे करावे । काम त्याने -३८-
राक्षस म्हणाले । आम्हीही करू कीं । मदत सागर । मंथावया -३९-
जरी स्वीकारला । प्रस्ताव देवांनी । सावध राहणें । योग्य होतें -४०-
मंथन करतां । वासुकीचे विष । अंगावर येणें । बरें नव्हे -४१-
शेपटी धरली । साऱ्या राक्षसांनी । फण्याकडे देव । सज्ज झाले -४२-
सर्वात प्रथम । चंद्र उफाळला । देवी लक्ष्मी मग । प्रकटली -४३-
कौस्तुभ मणी नि । हत्ती ऐरावत । गाय ती सुरभी । कामधेनू -४४-
इच्छादायी आला । सुगंधी प्राजक्त । रंभा देवांगना । सुरा तीही -४५-
अश्व सप्तमुख । धनु आणि शंख । हरीच्या शोभेस । प्रकटले -४६-
विष उफाळता । पळापळ झाली । शंभू नीळकंठ । प्राशनाने -४७-
अमृतकलश । घेऊनीया हातीं । सर्वां लुभावती । धन्वंतरी -४८-
देव-राक्षसांत । तुंबळ माजले । अखेर अमृत । देवांकडे -४९-
जीवसृष्टी सारी । शंकरांची ऋणी । विष प्राशूनियां । वांचविली -५०-

**(३)**

गंगायमुनांचे । खोरे कुरुभूमी । हस्तिनापुरी ती । राजधानी -५१-
अभिमन्यू-सुत । परीक्षित यास । सोपवीला भार । युधिष्ठिरे -५२-
परीक्षितानी तो । राज्यकारभार । नीट चालवीला । साठ वर्षे -५३-
परंतु शिकार । करतां घडली । परीक्षितहस्ते । नागहत्या -५४-
नागाने त्यावेळी । शाप उच्चारला । सप्ताहात मृत्यू । शिकाऱ्यास -५५-

लाकूडतोड्याने । शाप तो ऐकला । राजास सावध । त्याने केले -५६-
वृद्ध माणसाचे । रूप घेऊनीया । तक्षक पोंचला । राजद्वारी -५७-
जलाशयामध्ये । उंच स्तंभांवर । राजाचा महाल । बांधलेला -५८-
तरीही राजाचे । हातीच्या फळांत । होता ना तक्षक । अळीरूपें -५९-
बोर खाऊं जातां । तक्षक डसला । मृत्यू ऐसा झाला । परीक्षिता -६०-
जन्मेजयाकडे । राज्यधुरा आली । पित्याच्या मृत्यूची । व्यथा मनीं -६१-
त्याचे पारिपत्य । कराया राजाने । घोरसा मांडीला । सर्पयज्ञ -६२-
ऋषींच्या मंत्रांच्या । सामर्थ्याने होई । कितीक सर्पांचा । स्वाहाकार -६३-
तक्षक भिऊन । पहा लपलेला । इंद्राचेच मागे । चातुर्याने -६४-
संवेदना झाली । ऋषींना त्याचीही । आहुती बोलले । दोघांचीही -६५-
इंद्रही चालला । यज्ञवेदीकडे । तेव्हा त्याने वीज । सोडीयेली -६६-
निष्प्रभ ठरतो । प्रहार पाहून । बाजूस जाहला । इंद्र जसा -६७-
तक्षकास कोणी । वाली न उरला । यज्ञकुंडाकडे । झेपावता -६८-
इतुक्यांत आज्ञा । "तक्षक तिष्ठ"शी । अस्तिक मुनींनी । उच्चारली -६९-
नागिणीचे पोटी । जन्म जाहल्याने । सर्पवंशीयच । मुनी होते -७०-
जन्मेजयासही । त्यांनी विनवीले । सर्पयज्ञ आतां । थांबवावा -७१-
बदल्यात त्यांनी । हमी देऊं केली । सर्पजातीतर्फे । सलोख्याची -७२-
यज्ञ आवरूनी । राजा परतला । राजवाड्यामधे । तेव्हा तिथे -७३-
व्यासमुनी स्वतः । आले होते त्यांना । पाचारण केले । आदराने -७४-
आणि विनवीले । आहे आतुरता । जय इतिहास । ऐकण्याची -७५-
व्हावा उपदेश । जन्ममरणाच्या । गांठींचाही गुंता । उकलावा -७६-
यज्ञाची सांगता । योग्यशी होईल । कृपावंत व्हावे । सर्वांलागीं -७७-
व्यासांनी म्हटले । साथ आहे शिष्य । वैशंपायन हा । सांगेल तो -७८-
सूचना मानून । राजाने सादर । वैशंपायनांना । आमंत्रिले -७९-

**(४)**

राजा जन्मेजया । तुझा हा वारसा । कुरुकुलाचा बा । लौकिकाचा -८०-
चांद्रवंशी राजे । भरतादिकांचा । शेकडो वर्षांचा । इतिहास -८१-
आरंभ करितो । राजा प्रतीपाच्या । कारकीर्दीहून । तेंच बरें -८२-
राजा प्रतीपाचे । वय खूप झाले । तरी वंशदीप । नव्हताच -८३-
तपाचरणाचा । निश्चय करूनी । गंगेचे किनारी । राजा आला -८४-
स्वर्गात ते वेळी । स्वतः ब्रह्मदेव । यांचे प्रवचन । चाललेले -८५-
प्रतीपा आधीचा । राजा महाभीष । श्रोतृवृंदामधे । बसलेला -८६-
अचानक त्याचे । लक्ष गंगेकडे । गेले झाले चित्त । विचलित -८७-
ढळला तो आत्मा । शिरला प्रतीप । राजाच्या राणीच्या । गर्भामध्ये -८८-
प्रतीपाचा पुत्र । शंतनू जन्मला । राजास जाहले । समाधान -८९-

महाभीषाच्या त्या । आत्म्याचा मागोवा । करीत गंगाही । तिथे आली -९०-
प्रतीपास तिने । म्हटले तुझ्या या । मुलावर जीव । माझा आहे -९१-
याचे जन्माचेही । खूप काळ आधी । ऋणानुबंध तो । जडलेला -९२-
कांही वर्षांनी मी । परत येईन । ऋणानुबंधास । उजळाया -९३-
धरेस येण्याचा । गंगेचा तो बेत । अष्टवसूंना कीं । समजला -९४-
त्यानांही धरेस । येणें भाग होतें । प्रमाद कांहींसा । झाला होता -९५-
गंगेकडे आले । सारे अष्ट वसू । मदत मागण्या । तिची कांही -९६-
उषःकालचा जो । प्रभास नांवाचा । संधिवसु त्याने । सांगितले -९७-
त्याच्या पत्नीची ना । एक  सखी होती । पृथ्वीतलावर । जिवलग -९८-
गप्पामधे आला । उल्लेख गायीचा । स्वर्गलोकातील । सुरभीचा -९९-
सखीचा आग्रह । येऊं शकेल कां । दोहन कराया । पृथ्वीवर -१००-
सुरभीचे संगे । आम्ही अष्टवसू । गेलो पृथ्वीवरी । गुप्तपणें -१०१-
तरी वसिष्ठांनी । तपःसामर्थ्याने । कागाळी जाणूनी । शाप दिला -१०२-
आम्ही अष्टवसू । इंद्राचे सेवक । शापाने पृथ्वीस । गेल्यावर -१०३-
कैसी पुन्हा मुक्ती । मिळूनिया आम्ही । येऊं स्वर्गलोकी । चिंता आहे -१०४-
अष्टवसूंची ती । व्यथा समजून । गंगेने दिधले । आश्वासन -१०५-
तुम्ही पृथ्वीवरी । माझेच उदरी । जन्म घ्यावा मुक्ती । देईन मी -१०६-
प्रतीपानंतर । हस्तिनापुरीचा । शंतनू जाहला । अधिपती -१०७-
गंगेचे किनारी । विहार करतां । दृष्टीस पडली । रूपवती -१०८-
शंतनूने तिला । मागणी घातली । परि तिने अट । सांगितली -१०९-
स्वातंत्र्य मजसी । आहे प्रिय तरी । प्रश्न न कसला । करायचा -११०-
अट ही मोडेल । तत्क्षणी आपला । करेन मी पहा । परित्याग -१११-
शंतनूने तेव्हा । अट मानूनिया । केली पहा तीस । पट्टराणी -११२-
तीच गंगा होती । दरवर्षी एका । वसूस दिधला । जन्म तिने -११३-
जन्मल्या तान्ह्याला । गंगेत सोडावे । ऐसा घाट तिने । चालवीला -११४-
एकेक करीत । सात वसूना कि । तिने केले मुक्त । निश्चयाने -११५-
राजपुत्र ऐसे । गंगार्पण होता । शंतनू मुकाट । दृश्य साहे -११६-
आठव्याचे वेळी । नाही राहवले । शंतनूने तिज । प्रश्न केला -११७-
उत्तर न देतां । गंगा गंगेमध्ये । विलीन जाहली । क्षणैकात -११८-
शंतनूने मूल । महाली आणिले । तोच राजपुत्र । देवव्रत -११९-

**(५)**

कुरुप्रदेशाच्या । दक्षिणेस होते । चेदी वंशीयांचे । राज्य एक -१२०-
उपरिचरसा । राजा त्या देशाचा । शिकार खेळता । दमलेला -१२१-
राणी आली स्वप्नी । प्रणयविचारें । पानी टपकला । शुक्रजंतू -१२२-
एक घार पान । घेऊन उडाली । दुसरी भिडली । तिजसंगे -१२३-

यमुनेच्या पात्री । पान तें पडलें । माशाच्या मादीने । गिळले तें -१२४-
कोळ्याच्या जाळ्यात । सांपडली मादी । गर्भात कि होते । कन्यारत्न -१२५-
पाहुनी ती बाला । कोळी हरखला । नांव ठेवियेले । सत्यवती -१२६-
कालांतरे तीस । पराशर मुनी । गांधर्वविवाही । रत झाले -१२७-
त्यांचे पुत्ररत्न । पाराशर व्यास । ग्रंथाचे या तेच । रचयिता -१२८-
पिता पराशर । यांनी स्वपुत्रास । नेले आश्रमास । शिकवण्या -१२९-
सत्यवती तरी । माहेरी राहिली । कोळीण पित्याचे । झोपडीत -१३०-
नदीचे किनारी । विहार करीता । शंतनू पाहतां । सत्यवती -१३१-
भाळला लगेच । मागणी घातली । तिने मात्र अट । सांगितली -१३२-
पुत्र जरी तिचे । उदरी जन्मेल । राज्याचा वारस । होईल तो -१३३-
द्विधा मनःस्थिती । राजाची जाहली । देवव्रत होता । राजपुत्र -१३४-
राजकार्यामधे । लक्षही लागेना । सर्वत्र जाहली । अस्वस्थता -१३५-
देवव्रतानेही । सारथी नि मंत्री । सर्वांकडे केली । विचारणा -१३६-
कारण कांहीसे । समजले तेव्हा । सत्यवतीसंगे । भेट केली -१३७-
गादीवर नाही । कधी बसणार । प्रतिज्ञा बोलले । देवव्रत -१३८-
तेवढी प्रतिज्ञा । नाहीच पुरेशी । तुझ्या संततीची । काय हमी -१३९-
त्याचेही निरसन । कराया बोलले । राहीन आजन्म । ब्रह्मचारी -१४०-
ऐसी भयंकर । प्रतिज्ञा केल्याने । भीष्म ही उपाधी । प्राप्त झाली -१४१-
पित्याच्या सुखाची । राज्याच्या हिताची । भीष्मांनी सदैव । बूज केली -१४२-
मग खूप वर्षे । भीष्मांचे साथीने । शंतनूनी राज्य । चालविले -१४३-
भीष्मांच्या विश्वासें । सत्यवतीपुत्र । विचित्रवीर्यास । राजा केले -१४४-
ऐशा व्यवस्थेने । मग शंतनूने । वानप्रस्थाश्रम । स्वीकारला -१४५-

**(६)**

काशीच्या राजाच्या । राजकन्या तीन । अंबा नि अंबिका । अंबालिका -१४६-
त्यांचे स्वयंवर । घोषित जाहले । भीष्मांनी विचार । कांही केला -१४७-
वयाने कोवळा । विचित्रवीर्य तो । कैसेनी जिंकेल । स्वयंवर -१४८-
भीष्मांनी स्वतःच । मंडपी जाऊन । आणिले तीघीना । पळवून -१४९-
सत्यवतीकडे । हवाली करीता । थोरल्या अंबेने । सांगितले -१५०-
पश्चिमेकडील । राज्याचा जो राजा । शल्ब त्याचेवर । मन माझे -१५१-
सत्यवतीनेही । मोकळ्या मनाने । तिला शल्बाकडे । पाठविले -१५२-
अंबिका आणिक । अंबालिका यांचे । विचित्रवीर्याशी । लग्न झाले -१५३-
विचित्रवीर्याचे । परि अवसान । झाले अचानक । अल्पायुषी -१५४-
राज्याला वारस । नाही ना उरला । सचिंत जाहले । भीष्म पुन्हां -१५५-
सत्यवतीसवें । मंत्रणा करूनी । व्यासांना घेतले । बोलावूनि -१५६-
त्यांच्या प्रयोगाने । अंबिकेस पुत्र । झाला धृतराष्ट्र । जन्मांध तो -१५७-

अंबालिकेलाही । पुत्ररत्न झाले । पांडू त्याचे नांव । सर्वश्रुत -१५८-
एका दासीलाही । पुत्ररत्न झाले । त्याला सुद्धा मान । राजगृही -१५९-
विदुराने पुढे । राज्यकारभारीं । धर्म आणि नीति । जोपासली -१६०-
धृतराष्ट्र तरी । जन्मांध म्हणूनी । पांडूस पावले । राज्यपद -१६१-

**(७)**

कुरुप्रदेशाला । लागूनच होते । प्रसिद्ध पृथूचे । राज्य कुंती -१६२-
पृथूचा सलोखा । वृष्णीयांसी होता । दत्तक घेतली । कन्या एक -१६३-
कुंती आणि पृथा । दोन्हीही नांवानी । महाभारतात । सर्वश्रुत -१६४-
एकदा दुर्वास । ऋषी आले होते । राजा पृथुकडे । यात्रेकरी -१६५-
कुंतीने बहुत । सेवा खूप केली । दुर्वास संतुष्ट । झाले त्यांनी -१६६-
कुंतीस विशेष । मंत्र सांगितला । प्रसन्न कराया । देवतांना -१६७-
देवता प्रसन्न । होऊन देईल । देवतेसमान । पुत्र एक -१६८-
मंत्रसामर्थ्याची । प्रचिती पहाया । कुंतीस जाहली । अधीरता -१६९-
सूर्यदेवतेचे । स्मरण करोनी । कुंतीने तो मंत्र । उच्चारला -१७०-
क्षणार्धात तिच्या । पदरीं पावले । एक तेजःपुंज । पुत्ररत्न -१७१-
तयाच्या सर्वांगी । कठीण कवच । कर्णकुंडलेही । दीप्तिमान -१७२-
मी तरी कुमारी । पावले मातृत्व । ध्यानी येतां कुंती । बावरली -१७३-
दासीस घेऊनी । तेव्हा विश्वासात । होडी जैसी पेटी । करविली -१७४-
आणि बालकास । ठेऊनी पेटीत । गंगेचे प्रवाही । वाहवली -१७५-
मनोमनी केली । गंगेस प्रार्थना । बालकास नेई । सुखरूप -१७६-
प्रेमाने सांभाळ । करील कां कोणी । तैशा कोणाकडे । पोचवी गे -१७७-
अंगदेशी राहे । सज्जन जोडपे । अधिरथ आणि । पत्नी राधा -१७८-
रथ हाकण्याचे । कामी तो निष्णात । पांडूचा सारथी । त्याचा मान -१७९-
गंगेच्या प्रवाही । वाहात आलेली । पेटी ती मिळाली । अधिरथा -१८०-
पेटीत पाहूनी । साजिरा तो बाळ । देवाची कृपाच । अधिरथा -१८१-
नव्हता तो बाळ । सामान्य मुळीच । कर्णकुंडले नि । कवच तें -१८२-
घरी नेता बाळ । राधा माता तरी । अचंभित झाली । पाहूनिया -१८३-
उचंबळला कीं । मायेचा पाझर । आनंद मावेना । गगनांत -१८४-
दोघांनी ठेवीले । नांव त्याचे कर्ण । सर्वांचा लाडका । झाला बाळ -१८५-

**(८)**

कुंतीत पृथूने । राजकन्येसाठी । स्वयंवर होते । मांडीयेलें -१८६-
पांडूने जिंकले । सारे कांही पण । हस्तिनापूरची । कुंती राणी -१८७-
तेव्हाच भीष्मांनी । होती मद्रदेशी । धाडीली सौगात । माद्रीसाठी -१८८-
राखूनीया मान । त्याही आहेराचा । पांडूचा विवाह । आणि झाला -१८९-
एकदा शिकार । खेळतांना बाण । पांडूचा लागला । हरिणाला -१९०-

हरीणयुगुल । होते प्रणयात । पांडूच्या बाणाने । घात केला -१९१-
शाप उच्चारीला । तेव्हा हरिणांनी । तूही पावशील । मृत्यू ऐसा -१९२-
व्यथित मनाने । पांडू परतला । संसार असार । त्यासी झाला -१९३-
धृतराष्ट्राकडे । सारा राज्यभार । सोपवूनी पांडू । वनीं गेला -१९४-
कुंती आणि माद्री । त्याही सेवेलागी । गेल्या पांडूसंगे । वनामध्ये -१९५-
धृतराष्ट्र अंध । असल्याने राणी । गांधारीही बांधे । डोळां पट्टी -१९६-
दुर्वासऋषींच्या । मंत्राविशीं कुंती । गोष्ट बोलूं गेली । पांडूलागी -१९७-
मंत्रसामर्थ्याने । राज्यास वारस । होतील संमती । जरी देता -१९८-
संमती मिळता । प्रार्थिले यमास । पुत्र तो पावला । युधिष्ठिर -१९९-
वायूस प्रार्थूनी । पुत्र भीम आणि । इंद्राचे कृपेने । अर्जुनही -२००-
माद्रीनेही मग । अश्विनीकुमार । प्रार्थितां नकुल । सहदेव -२०१-
हस्तिनापुरात । गांधारीचे पोटी । एकमेकांमधे । गुंतलेल्या -२०२-
शंभर जीवांचा । गोळा जैसा गर्भ । सारीच विचित्र । परिस्थिती -२०३-
भीष्मांचे साथीने । व्यासमहर्षीनी । एकशे एक ते । सुटे केले -२०४-
लोण्याने भरल्या । रांजणात त्यांची । व्यवस्था करून । बागेमधे -२०५-
खड्डे खणूनिया । रांजण पुरूनी । भीष्मांना व्यासांनी । सांगितले -२०६-
दोन वर्षांनी मी । येईन तेव्हा हे । रांजण उघडूं । काळजी घ्या -२०७-
मुलगे शंभर । आणि एक कन्या । रांजण खोलोनी । काढीयेले -२०८-
पहिल्याचे नांव । दुर्योधन आणि । दुसऱ्याचे नांव । दुःशासन -२०९-
शंभर भावांची । बहीण दुःशला । सर्वात धाकटी । लाडकी ही -२१०-
आश्रमांत पांडू । रमला मुलांत । शापाचेही झाले । विस्मरण -२११-
नदीकाठी माद्री । स्नान करूनिया । येतांना मोहित । पांडू झाला -२१२-
स्पर्श करूं गेला । गतप्राण झाला । मनोघाते गेली । माद्री सुद्धा -२१३-
पांच पांडवांना । घेऊनीया कुंती । हस्तिनापुरास । परतली -२१४-

**(९)**

शंतनूचे वेळी । एका सैनिकाला । सांपडली होती । दोन बाळे -२१५-
त्याने ती सुपूर्द । राजास केलेली । कृप आणि कृपी । त्यांची नांवें -२१६-
राजवाड्यातच । त्यांचे संगोपन । व्यवस्थित झाले । राजकृपे -२१७-
त्याच सुमारास । पांचाल देशात । आश्रमी राहती । भारद्वाज -२१८-
तेथे नदीमध्ये । स्नान करण्यास । कुणी अप्सराच । आली होती -२१९-
पाहूनी लावण्य । मुनींचे जाहले । वीर्यपतनसे । अवचित -२२०-
द्रोण जैशा पर्णी । वीर्य पडल्याने । अर्भक जन्मले । तेणें रीती -२२१-
द्रोण तेंच नांव । मुलाचे ठेवीले । मुनींनी प्रेमाने । वाढविले -२२२-
पांचालनृपाने । मुनींचे आश्रमी । होता धाडीयेला । राजपुत्र -२२३-
मुनींचे आश्रमी । द्रोण-द्रुपदाचे । मित्रत्व जमले । घनिष्टसे -२२४-

द्रोणास वचन । दिले द्रुपदाने । कधीही जरूर । पडल्यास -२२५-
निःसंकोच यावे । राजदरबारी । सारी चिंता दूर । करेन मी -२२६-
भारद्वाज मुनी । स्वर्गवासी झाले । फिरत निघाले । द्रोणाचार्य -२२७-
हस्तिनापुरात । गांठभेट झाली । कृप आणि कृपी । यांच्यासंगें -२२८-
कृपीसाठी योग्य । वर द्रोणाचार्य । मानूनी कृपाने । तैसे केले -२२९-
कृपीसंगे द्रोण । आले पांचालांस । संसार मांडला । खेडेगांवीं -२३०-
पुत्र अश्वत्थामा । याचा जन्म झाला । कपाळी तयाचे । नीलमणी -२३१-
द्रोणांची गृहस्थी । होती गरीबीची । हातातोंडाची ती । मिळवणी -२३२-
अश्वत्थाम्यालागी । दूध म्हणूनिया । कृपी देई पीठ । कालवूनी -२३३-
एकदा द्रोणांचे । नजरेस आले । मनी वरमले । करू काय -२३४-
स्वाभिमान आता । सोडला पाहिजे । द्रुपद स्वतःच । राजा आहे -२३५-
राजदरबारी । जाऊनी द्रोणांनी । आठव दिधला । द्रुपदास -२३६-
द्रुपदाने परि । नाही ओळखले । शिपायांकरवी । घालविले -२३७-
हताश ते द्रोण । हस्तिनापुरास । जाणाऱ्या वाटेने । चाललेले -२३८-
शंभर नि पांच । राजपुत्र परि । हिरमुसलेले । होते सारे -२३९-
काय झाले ऐसे । द्रोणांनी पुसीले । चेंडू पडलेला । विहिरीत -२४०-
घेऊनीया त्यांचे । धनुष्य नि बाण । चेंडूस बाहेर । उडविले -२४१-
चकित झालेल्या । राजकुमारांनी । भीष्मांना कौतुक । सांगीतले -२४२-
राजकुमारांना । अस्त्र-शस्त्र-विद्या । युद्धविद्या तीही । शिकवण्या -२४३-
भीष्मांनी द्रोणांची । नेमणूक केली । द्रोणांचा संसार । सांवरला -२४४-

**(१०)**

राजकुमारांच्या । जोडीचाच होता । पुत्र अश्वत्थामा । तोही शिष्य -२४५-
गुरुसेवेलागी । साऱ्याच शिष्याना । पाणी भरण्याचे । काम होते -२४६-
अरुंद तोंडाचे । कुंभ सर्वांसाठी । मात्र रुंद पात्र । पुत्रासाठी -२४७-
अश्वत्थाम्याचे ना । काम निपटावे । सर्वांआधी ऐसी । योजना ती -२४८-
ऐशा योजनेने । स्वतःचे मुलास । विशेषसें ज्ञान । देतां यावें -२४९-
अर्जुनाने मात्र । स्वतःचे क्लृप्तीने । जलसंयंत्रसें । बनविलें -२५०-
आपुलेंही काम । वेगें आटोपून । दाखल व्हायचा । ज्ञानार्जना -२५१-
धनुर्विद्या कैसी । अवगत झाली । पाहण्या परीक्षा । योजलेली -२५२-
पेंढा भरलेला । पोपट द्रोणांनी । वृक्षाचे शेंड्यास । बांधलेला -२५३-
प्रथम भीमास । बोलाविले तोही । नेम धरूनीया । सज्ज झाला -२५४-
नजरेसमोर । काय काय तुज । दिसते तें सांग । प्रश्न झाला -२५५-
भीमाची नजर । सारेच आकाश । पाहते म्हणून । थांबवीले -२५६-
सर्वात एकाग्र । अर्जुनाचा नेम । पक्ष्याचा डोळाच । भेदीयेला -२५७-
गुरुदक्षिणेस । द्रोण आज्ञापिती । काढण्या घालाव्या । द्रुपदाला -२५८-

पांचाल देशाची । कांपिल्य नगरी । राजधानीवरी । हल्ला झाला -२५९-
द्रुपदाने जरी । शर्थ करूनिया । कौरव पांडव । पळविले -२६०-
अर्जुनाने मात्र । आधी द्रुपदाचा । छिन्नभिन्न केला । रथ पूरा -२६१-
त्याचेच रथात । लोळवूनी बंदी । केले द्रुपदास । अर्जुनाने -२६२-
खेचून आणिलें । गुरुंचे समोर । द्रोणांचा प्रस्ताव । द्रुपदाला -२६३-
पांचाल देशाच्या । उत्तर भागाचे । द्यावे अधिपत्य । द्रोणांकडे -२६४-
ऐशा कराराने । दोघेही समान । राहू द्यावे भान । याचे सुद्धा -२६५-

**(११)**

सारे राजपुत्र । दावोत कौशल्ये । म्हणूनी द्रोणांनी । योजीयेलें -२६६-
मोठा समारंभ । होणार म्हणूनी । साऱ्याच प्रजेस । कुतूहल -२६७-
अर्जुनाने केली । आतषबाजीच । टाळ्या वाजायच्या । वारंवार -२६८-
समारंभाच्या त्या । समारोपासाठी । मंचकाचे पाशी । द्रोण आले -२६९-
इतुक्यांत आली । आव्हानाची साद । "थांबा" ऐसी हांक । युवकाची -२७०-
अनुमतीचीही । वाट न पाहतां । थेट उतरला । मैदानांत -२७१-
अर्जुनाने जे जे । प्रकार दाविले । केले सर्व त्याने । सफाईने -२७२-
कौतुक करण्या । कृपाचार्य आले । पुसिली ओळख । युवकाची -२७३-
म्हणाला आलो मी । अंगदेशाहूनी । वडील सारथी । अधिरथ -२७४-
सारथी कुळीच्या । पोराचे आव्हान । राजपुत्रासंगे । योग्य काय -२७५-
कुजबूज ऐसी । सुरू जाहलेली । वेगळा विचार । दुर्योधना -२७६-
गुणग्राहकता । मुत्सद्देगिरीही । मनाचे औदार्य । दाखवीत -२७७-
घोषणाच केली । युवक हा कर्ण । जाणा अंगराज । माझा मित्र -२७८-
अधिरथ होते । जवळीच उभे । कर्णाने वंदन । त्यांना केले -२७९-
अर्जुनास मात । देईलसा कुणी । आपलासा केला । दुर्योधने -२८०-
कर्णकुंडले ती । पाहून तयाची । कुंतीस जाहली । गलबल -२८१-
कर्ण नि अर्जुन । आपलेच पुत्र । जन्माचे वैरी कां । आज झाले -२८२-
एका नजरेने । त्रिकालज्ञानाचे । धनी होते भीष्म । समजले -२८३-

**(१२)**

दुर्योधनाने कि । स्वतःच निश्चित । केलेले माझेच । सिंहासन -२८४-
राजे धृतराष्ट्र । यांचा ज्येष्ठ पुत्र । म्हणून माझाच । अधिकार -२८५-
परि प्रजेमध्ये । प्रेम नि आदर । पांडवांविषयी । खूप होता -२८६-
धृतराष्ट्रांआधी । राजे होते पांडू । म्हणून पांडव । अधिकारी -२८७-
वयानेही ज्येष्ठ । सारेच पांडव । आणिक सद्गुणी । लोकप्रिय -२८८-
वार्णावतातील । वार्षिक यात्रेस । राजप्रतिनिधी । युधिष्ठिर -२८९-
राजाज्ञेने ऐसे । निश्चित झाल्याने । भविष्याचे चित्र । स्पष्ट झाले -२९०-
पांडवांचा कांटा । काढला पाहिजे । दुर्योधनानेही । ठरवीले -२९१-

वार्णावतामध्ये । राजप्रतिनिधी । कोठे राहतील । व्यवस्था ती -२९२-
करण्याचे कामी । मंत्री पुरोधन । त्यांचेशी सलोखा । करूनिया -२९३-
दुर्योधनाने कि । लखलखणारा । महाल लाखेचा । बांधवीला -२९४-
जाण्यायेण्यासाठी । एकच असावे । दार निवासास । योजीयेले -२९५-
परि कुणकुण । कारस्थानाची त्या । कांहीशी लागली । विदुरांना -२९६-
केवळ संकेत । धर्म समजला । त्याने आज्ञा केली । नकुलाला -२९७-
हवीत आपणां । पहा सहा प्रेतें । पैकी एक स्त्रीचे । असावे गा -२९८-
वार्णावतामध्ये । पांडव पोचेतो । मजूर दाखल । धर्माकडे -२९९-
पिंजऱ्यात एक । उंदीर घेऊन । पाठवीला होता । विदुरांनी -३००-
खाणकामगार । उंदराप्रमाणे । बनवेल बीळ । योजलेले -३०१-
यात्रेच्या शेवटी । समारंभामध्ये । धर्माचे भाषण । समर्पक -३०२-
समारंभ झाला । पांडव नि कुंती । विश्रामास आले । लाक्षागृही -३०३-
पुरोधनाने कि । आग लावियेली । धडाड पेटले । लाक्षागृह -३०४-
भीमाने घेऊनी । पुरोधनावरी । झेप त्याचा केला । चेंदामेंदा -३०५-
मजुराने होते । भुयार खणले । त्यातूनिया सारे । निसटले -३०६-
शेवटास होता । भीम त्याने शिळा । ओढूनीया बीळ । बंद केले -३०७-
शिळेच्या आघातें । लाक्षागृह सारे । कोसळले झाले । जमीनदोस्त -३०८-
भुयारामधून । पांडव नि कुंती । आले नदीकाठी । सुखरूप -३०९-
विदुरानी होता । नावाडी धाडीला । पलीकडे आले । तैसे सारे -३१०-
नावाड्याने दिली । पांचांना धोतरे । जीर्ण फाटकीच । ब्राह्मणांची -३११-
कुंतीसाठी साडी । तीही साधीसुधी । नवखाच एक । अनुभव -३१२-
वार्णावतामध्ये । आग पाहूनिया । प्रजाजन सारे । गोळा झाले -३१३-
ढिगाऱ्याखालती । राखच झालेली । दिसली लोकांना । सहा प्रेते -३१४-

**(१३)**

एकचक्र नामे । नगरीं निवारा । दिधला गरीब । ब्राह्मणाने -३१५-
भिक्षा मागूनियां । आणिल्या शिध्याचा । अर्धा भाग सारा । भीम खाई -३१६-
एके दिनीं परि । यजमाना घरीं । वाद चाललेला । कुंती ऐके -३१७-
चौकशी करतां । ब्राह्मण म्हणाला । नगरी राखतो । बकासुर -३१८-
मात्र त्याची अट । दर अवसेस । नरबळी त्यास । द्याया हवा -३१९-
चिठ्ठ्या टाकूनिया । ठरते कोणत्या । घराने धाडावा । नरबळी -३२०-
आम्हीही फिरत । आलों या गांवांत । म्हटले पाहावे । जेव्हां तेव्हां -३२१-
उद्या अवसेस । चिठ्ठी निघालीसे । आमच्या घराची । तोच वाद -३२२-
प्रत्येक म्हणतो । मीच जाणें बरें । निर्णय ऎसेनी । होत नाहीं -३२३-
कुंतीने निर्णय । निश्चयाने दिला । गुहेस जाईल । भीम माझा -३२४-
ब्राह्मण म्हणाला । भीमास धाडता । यजमानधर्म । मोडतो ना -३२५-

भीमास काहीच । नाही व्हावयाचे । चिंता मुळी कोणी । नका करूं -३२६-
भीम हा जन्मला । तेव्हां मी झाडीचे । होते आडोशास । बाळ हाती -३२७-
कोठून आलेल्या । वाघाने हुंगले । माझ्या कानापाशी । अचानक -३२८-
दचकूनी तेव्हां । उठतांना बाळ । हातातून माझ्या । पडला कीं -३२९-
शिळेवरी जरी । बाळ हा पडला । कांही नाही झाले । त्यास मुळी -३३०-
उलट शिळेच्या । ठिकऱ्या उडाल्या । त्याने घाबरला । वाघ सुद्धा -३३१-
दुसरे  दिवशी । रेड्याचे गाडीत । भात रचूनिया । भीम गेला -३३२-
रेडा सोडूनिया । गाडयातील भात । स्वतःच  खाण्याचे । सुरू केले -३३३-
नाकांत शिरता । वास बकासुर । गुहेच्या बाहेर । जेव्हा आला -३३४-
पाहतो अजब । माझेसाठी अन्न । आणोनी स्वतःच । खातो कोण -३३५-
कुस्ती जी जुंपली । जोराच्या ठोशाने । भीमाने राक्षस । लोळवीला -३३६-
छातीवर त्याच्या । प्रहार करूनी । अवसान सारे । संपविले -३३७-
गाड्यात घालूनी । प्रेत राक्षसाचे । आणूनी टांगीले । वेशीवर -३३८-
रातोरात मग । कुंती नि पांडव । निघूनीया गेले । गांवातून -३३९-
बकासुराचे ते । प्रेत पाहूनिया । ब्राह्मणाचे घरीं । लोक आले -३४०-
ब्राह्मण म्हणाला । मृत्यूदाता मंत्र । जाणणारा कोणी । आला होता -३४१-
परि मंत्रोच्चार । जिथे केला तेथे । नाही राहायचे । नेम त्याचा -३४२-
बकासुरालागी । देऊनिया मृत्यू । निघोनीया पहा । विप्र गेला -३४३-
लोकांनी अज्ञात । ब्राह्मणाचे नांवे । स्मारक गांवात । उभारले -३४४-
कांही दिवसांनी । कुंती नि पांडव । ब्राह्मणाचे घरी । परतले -३४५-

**(१४)**

एके दिनीं मग । सर्वज्ञ व्यासच । दाखल जाहले । यांचे घरीं -३४६-
आठव दिधला । राजा जो द्रुपद । अर्जुनाने होता । बंदी केला -३४७-
द्रुपदाने मग । हवन करूनी । अग्नीस प्रसन्न । होते केले -३४८-
तेव्हा परामर्श । द्रोणांचा घेण्यास । अग्नीने दिधला । धृष्टद्युम्न -३४९-
आणि अर्जुनास । वशात ठेवण्या । द्रौपदीही दिली । अनलाने -३५०-
त्याच द्रौपदीचे । स्वयंवर आतां । द्रुपदाने आहे । मांडीयेलें -३५१-
जावें तेथे मात्र । द्रौपदी जिंकेतों । सुगावा कोणास । लागूं नये -३५२-
वार्णावतातील । आगीत पांडव । गेले ती बातमी । द्रुपदास -३५३-
नव्हती पटली । प्रत्यक्ष अग्नीचा । प्रसाद ठरेल । खोटा काय -३५४-
अर्जुनाखेरीज । द्रुपदास कोणी । नव्हते कधीच । हरवले -३५५-
द्रौपदीस वर । अर्जुनच योग्य । द्रुपदाचे मनीं । ठरलेले -३५६-
स्वयंवरासाठी । विशेष धनुष्य । करवीला होता । द्रुपदाने -३५७-
जैसा कीं तयास । केवळ अर्जुन । लावेल प्रत्यंचा । ऐसा खास -३५८-
स्वयंवरासाठी । देशोदेशाहून । कितीक आलेले । राजपुत्र -३५९-

हस्तिनापूरच्या । कौरवांचे संगें । येण्याचे कर्णाने । टाळलेच -३६०-
जरी अंगराज । आहे तो मुळात । सारथ्याचा पोर । सर्वश्रुत -३६१-
स्वयंवर कर्ण । जिंकेल तरीही । द्रौपदी मनानें । मानेल ना -३६२-
सजल्या सभेस । धृष्टद्युम्न सांगे । स्वयंवरासाठी । पण काय -३६३-
वर फिरणाऱ्या । माशाचे पाहूनी । प्रतिबिंब खाली । परातीत -३६४-
आहे भेदायाचा । डोळा त्या माशाचा । सोडूनिया बाण । धनुष्याने -३६५-
खजील जाहले । किती राजपुत्र । प्रत्यंचाही नाही । धनुष्यास -३६६-
ब्रह्मवृंदातून । पांडव पाहती । गंमतच जणू । चाललेली -३६७-
अखेर अर्जुन । ब्राह्मणवेशात । पुढे आला धनु । वंदीयेला -३६८-
मत्स्यभेद केला । कृष्णांनी खुणेने । संमति दिधली । द्रौपदीला -३६९-
राजधानीमध्ये । पांडवांनी सोय । कुंभाराचे घरी । केली होती -३७०-
द्रौपदीस सवें । घेऊनी पांडव । दाराशीच थोडे । थांबलेसे -३७१-
धर्माने कुंतीस । आवाज देतांना । म्हटले आणली । भिक्षा माये -३७२-
कुंतीने सहज । म्हटले सर्वांनी । घ्यावी वांटूनीया । समभागें -३७३-
ऐसे म्हणत ती । आली अंगणात । पाहती जाहली । द्रौपदीस -३७४-
काय मी बोलले । ऐसे तीस झाले । पांची पांडवही । संभ्रमात -३७५-
द्रौपदीने केले । कुंतीस नमन । कुंतीने औक्षण । तिचे केले -३७६-
सारी गप्प गप्प । घरांमधे गेली । श्रीकृष्ण आलेले । पाठोपाठ -३७७-
आतेस नमन । श्रीकृष्णांनी केले । पांडव नव्हते । ओळखत -३७८-
सर्वांचा संभ्रम । घालवीत कृष्ण । सांगते जाहले । द्रौपदीस -३७९-
आधीच्या जन्मांत । अग्निदेवापाशी । वर मागीतला । होतास तूं -३८०-
माझा पती हवा । सर्वगुणी ऐसा । तथास्तु म्हणाले । अग्निदेव -३८१-
माहीत नव्हते । एकलाच कोणी । सर्वगुणी ऐसा । नसतोच -३८२-
पांच हे पांडव । मिळून तुजला । लाधले पती कीं । सर्वगुणी -३८३-
अर्जुनाचे मनीं । कुतूहल होते । कृष्ण बलराम । भाऊ कैसे -३८४-
कुंभाराचे घरी । भेटण्याचे आधी । पाहीले नव्हते । यांना कधी ३८५-
युधिष्ठिरानेच । समजाविले कीं । मामा वसुदेव । कृष्णपिता -३८६-
बालपणी कृष्ण । यमुनेचे कांठीं । वृन्दावनांमधे । रहायचा -३८७-
आता द्वारकेत । राजे उग्रसेन । यांचेकडे दोघे । राहतात -३८८-
आपली बहीण । आली कोण्या घरी । पाहण्या आलेला । धृष्टद्युम्न -३८९-
श्रीकृष्णांचे शब्द । ऐकून वृत्तांत । त्याने द्रुपदास । निवेदिला -३९०-
द्रुपदाने मग । कुंती नि पांडव । सर्वांचे स्वागत । भले केले -३९१-
अर्जुनाने केला । स्वतःच खुलासा । द्रौपदीचे पति । आम्ही पांच -३९२-
धृष्टद्युम्नाहाती । राजपत्र दिले । हस्तिनापुरास । कळवाया -३९३-
धृतराष्ट्रानेही । आभार मानले । मोकळ्या मनाने । द्रुपदाचे -३९४-

पांडवांच्या जीवां । आंच न येईल । त्याचेही दिधले । आश्वासन -३९५-
विदुरानी दिला । राजालागी सल्ला । संमती दिधली । भीष्मांनीही -३९६-
खांडववनाच्या । प्रदेशाची द्यावी । जबाबदारी ती । पांडवांना -३९७-
राजाज्ञा मानून । पांडव पोचले । खांडववनात । लगेचच -३९८-
राजधानीसाठी । प्रथम नगरी । वसविली एक । इंद्रप्रस्थ -३९९-
द्वारका नगरी । कैसी ती पाहावी । अर्जुन बोलला । मनोगत -४००-
युधिष्ठिरांनीही । दिल्याने संमती । अर्जुन पोंचला । द्वारकेस -४०१-

**(१५)**

कृष्णास निरोप । होताच मिळाला । मनःसामर्थ्याने । सहजीच -४०२-
कृष्णांनी स्वतःच । स्वागतही केले । वेशीजवळीच । अर्जुनाचे -४०३-
राजवाड्यामधे । हातात सुरई । दिसला झिंगता । बलराम -४०४-
नांगर माझा ना । गेला कोठे बोला । होता बरळत । झिंगताना -४०५-
कृष्णाने खुलासा । अर्जुनास केला । त्याचे तें आयुध । खास आहे -४०६-
नीलांबर त्यास । आवडे वसन । दादाचे सारेच । विशेषच -४०७-
आला तूं इकडे । तेव्हां बलराम । हस्तिनापुरास । गेला होता -४०८-
गदायुद्धामध्ये । आहे हा निष्णात । दुर्योधनास तें । शिकविले -४०९-
द्वारकेत मग । विहार करतां । अर्जुनाची झाली । दृष्टादृष्ट -४१०-
कृष्णांनी समोर । येऊन लगेच । ओळख दिधली । सुभद्रेची -४११-
दोघे परस्परां । आकृष्ट जाहले । कृष्णाचे लगेच । ध्यानी आले -४१२-
राजवाड्यामध्ये । विचार चालला । सुभद्रा झालीसे । उपवर -४१३-
कृष्णाने स्वतःचा । देऊनिया रथ । सुभद्रा अर्जुना । सोपविली -४१४-
त्यांच्या मागोमाग । आहेर घेऊनी । स्वतःही पोंचला । इंद्रप्रस्थी -४१५-

**(१६)**

यमुनेच्या कांठीं । कृष्ण नि अर्जुन । फिरत असतां । एके दिनीं -४१६-
लाकूडतोडयासा । समोरूनी आला । म्हणाला मी तरी । अग्निदेव -४१७-
हवनांचे तूप । सारखे सेवून । झालेला आहे मी । मेणचट -४१८-
खांडववनात । वणवा करावा । आहे मनीं इच्छा । कधीचीच -४१९-
तैसे करण्याने । सतेज होईन । प्रयत्नही केला । सात वेळां -४२०-
खांडववन हें । नाही जाळूं दिलें । इंद्रानें मजला । एकदाही -४२१-
पशुपक्षी आणि । मनुष्य वस्तीही । आहेच ना इथे । वनामध्ये -४२२-
म्हणून तुजला । नाही जाळूं दिलें । वाटते इंद्राने । ठीक केलें -४२३-
साऱ्याना निघून । जाण्या फुरसत । देईन अग्नीने । आश्वासिलें -४२४-
तरीही इंद्राचा । पाऊस रोकण्या । पाहिजे उपाय । कांही केला -४२५-
अग्नीने अर्जुना । दिधला गांडीव । भात्यात अक्षय्य । बाण दिले -४२६-
अर्जुनाने मग । वणव्यावरती । बाणांचेच छत । लावियेले -४२७-

पवनास्त्राचाही । प्रयोग करून । ढगही लावीले । पळवून -४२८-
अर्जुनाचे तैसे । पाहण्या कौशल्य । नभीं देवगण । गोळा झाले -४२९-
ऐरावतावरी । स्वतः इंद्र आले । सागराधिपती । वरूणही -४३०-
मृत्युदेव यम । आणि सेनानींचा । युद्धदेव स्कंद । मोरावरी -४३१-
वैभवाधिपति । कुबेर आणिक । अश्विनीकुमार । वैश्रवण -४३२-
कृष्णाने इंद्राला । केली जणूं खूण । आहे ना मी इथे । नको चिंता -४३३-
खांडववन तें । झाले भस्मसात । अग्नी कोणाचे कां । मागे आहे -४३४-
अर्जुना वाचव । कानीं आला शब्द । अभय बोलला । अर्जुनही -४३५-
अर्जुनाने तैसे । दिल्याने अभय । अग्नीने सोडला । पाठलाग -४३६-
मायासुर आला । अर्जुनाचे पुढे । आभार मानूनी । विचारीत -४३७-
आपण अभय । दिल्याने वांचलों । उतारू होण्यास । काय करूं -४३८-
राजमहालच । बांधशील काय । मायासुर म्हणे । जशी आज्ञा -४३९-
सर्वांच्या नजरा । बांधून मायाने । रचिला महाल । अप्रतिम -४४०-
पडदा काढून । म्हटले मायाने । घ्यावा पाहूनिया । महाल हा -४४१-
पहाया निघाले । सारेच पांडव । कृष्णाने म्हटले । सावधान -४४२-
माया जे रचितो । मायाजालचि तें । अखंड असावें । सावधान -४४३-
पांडव महाली । आले रहावया । कृष्ण परतले । द्वारकेस -४४४-

**(१७)**

महालाची वार्ता । पाहता पाहता । होती पसरली । सर्वदूर -४४५-
दुर्योधनाने कीं । संदेश धाडीला । शकुनीमामांना । घेऊनीया -४४६-
हस्तिनापुरास । जातांना वाटेत । इंद्रप्रस्था द्यावी । भेट मनीं -४४७-
भीमाने म्हटले । निरोप वाटतो । वरवर तरी । साळसूद -४४८-
अर्जुन म्हणाला । स्वागत तरीही । आपणां करावें । लागणार -४४९-
दुर्योधन एका । दालनांत जातां । फरशी नव्हती । फसला कीं -४५०-
पाण्यांत पडता । हंसू जे फुटले । आणिक शेराही । कोणी केला -४५१-
पिता जरी अंध । पुत्र नव्हे ना गे । ऐसी खुदखुद । कानी आली -४५२-
दुर्योधनाने तो । बोल ओळखला । कोणी केला त्याचा । अपमान -४५३-
निषेध करीत । धर्मास म्हणाला । यजमानधर्म । हा तो नव्हे -४५४-
धर्माने म्हटले । अतिथीने स्वतः । व्यवधान नाही । राखियेलें -४५५-
यजमानधर्म । कैसा बा मोडतो । राहावे सावध । इतःपर -४५६-
दुर्योधनानेही । दिधले आव्हान । हस्तिनापुरास । यालच कीं -४५७-
शकुनीमामांनी । पुस्ती जोडीयेली । यावेच खेळाया । द्यूत तुम्ही -४५८-

**(१८)**

दुर्योधन आणि । शकुनीमामांचे । द्यूताचे आव्हान । स्वीकारुनी -४५९-
पांडव द्रौपदी । आणि लवाजमा । हस्तिनापुरास । भेटी आला -४६०-

फार दिवसांनी । लाडके पांडव । आल्याने स्वागत । जंगी झाले -४६१-
पट मांडूनिया । द्यूत झाले सुरू । फासे दगा देती । पांडवांना -४६२-
डावामागूनिया । डाव हरल्याने । कफल्लक झाला । युधिष्ठिर -४६३-
अखेर लाविली । द्रौपदी पणास । हार झाली त्याही । डावामध्ये -४६४-
खेळाचे ठिकाणी । आणाया द्रौपदी । सेवकांसी आज्ञा । तेव्हां झाली -४६५-
अंतर्गृहामध्ये । द्रौपदी मानेना । दुःशासन मग । स्वतः गेला -४६६-
द्रौपदीची साडी । फेडण्याचे धार्ष्ट्य । दुःशासना मनीं । स्फुरलेले -४६७-
द्रौपदीने तेव्हा । श्रीकृष्णाचा धांवा । मनोमनी केला । आर्ततेने -४६८-
स्वयंप्रदक्षिणा । द्रौपदी करीते । दुःशासन साडी । ओढतोचि -४६९-
ओढून ओढून । दमला तो वीर । हाताचे पायांचे । त्राण गेले -४७०-
तोल जाउनीया । आपटले डोके । बेशुद्ध जाहला । दुःशासन -४७१-
तेव्हा दुर्योधन । स्वतःच उठला । तिच्यावर हात । टाकण्यास -४७२-
भीष्मांनी लगेच । त्याला अडविले । रागाने उघडी । मांडी केली -४७३-
भीमही चिडला । करीन चुराडा । तुझ्या या मांडीचा । ठेव ध्यानी -४७४-
सारा तो गोंधळ । चालला म्हणून । राजांना घेतले । बोलावूनि -४७५-
धृतराष्ट्राने ते । फासे उघड्याच । हातांमध्ये त्वेषें । चुरडले -४७६-
हात रक्ताळले । पाहून हातांना । पट्टी बांधियेली । द्रौपदीने -४७७-
राजांनी सगळ्या । डावांचे निकाल । रद्दबातलच । ठरविले -४७८-
दुर्योधनानेही । आक्षेप घेतला । राजांनी पुसीले । काय हवे -४७९-
एक डाव तरी । अजूनही व्हावा । हरेल तयास । वनवास -४८०-
वनवास तोही । बारा वर्षे आणि । अज्ञातवासही । एक वर्ष -४८१-
अज्ञातवासात । शोध लागल्यास । पुन्हा तेरा वर्षे । तेंच चक्र -४८२-
अशी किती चक्रे । सुरू रहायाची । धर्माने खुलासा । विचारला -४८३-
दोनदाच पुरे । ऐसे ठरल्याने । द्यूतास जाहली । सुरवात -४८४-
पांडव हरले । तोही डाव तेव्हां । उडीच मारली । कौरवाने -४८५-
विदुरांनी तेव्हां । सूचना मांडली । कुंतीने रहावें । राजगृही -४८६-
सुभद्रेने तरी । जावे द्वारकेस । तिची पाठवण । तैसी झाली -४८७-
नदी ओलांडूनी । पांडवांनी केला । वनांत प्रवेश । निश्चयाने -४८८-

**(१९)**

अर्जुन शिकार । मिळते कां कांही । म्हणूनियां गेला । वनामध्ये -४८९-
हरीण मारिला । तोंवर आलेले । श्रीकृष्ण भेटाया । त्याला तिथे -४९०-
दोघांनी मिळून । ओढूनीया नेला । पर्णकुटीमधे । हरीण तो -४९१-
कृष्णास वंदन । द्रौपदीने केले । म्हणाली आभार । किती मानूं -४९२-
भक्तांचे करावें । संकटी रक्षण । ब्रीद माझे आहे । जरी खरे -४९३-
तरी मजलाही । राखावा लागतो । मान नियतीचा । साकल्याने -४९४-

चुकवूं शकलो । नाही वनवास । माझीही मर्यादा । ध्यानी घ्यावी -४९५-
रक्षण करणें । कष्ट निवारणे । वेगळ्या आहेत । गोष्टी पहा -४९६-

**(२०)**

एकदां अर्जुन । भटकून यावें । म्हणून बाहेर । गेला होता -४९७-
झाडाखाली कोण्या । म्हाताऱ्यास झिंग । आली होती जणूं । तैसी स्थिती -४९८-
एक घोट दिला । अर्जुनास सुद्धा । क्षणांत गायब । गेला कुठे -४९९-
मागे झुडुपात । झाली सळसळ । शब्दवेधें बाण । सोडीयेला -५००-
रानडुकराला । नेम लागलेला । परि दोन बाण । त्याचे तोंडी -५०१-
तोंवर धिप्पाड । जंगली माणूस । म्हणाला शिकार । माझी आहे -५०२-
हुज्जत घालणें । नव्हते प्रशस्त । पूजेचीही वेळ । झाली होती -५०३-
नदीचे किनारी । वाळूचेच लिंग । बनवूनि फूल । वाहियेलें -५०४-
डोळे मिटूनीया । ध्यान झाल्यावर । पहावें तों फूल । नव्हते कीं -५०५-
मागे उभा होता । जंगली पाहुणा । त्याच्या जटेवर । तेंच फूल -५०६-
अर्जुनाचे मनीं । चमकले तेंव्हां । हे तो स्वतः शंभू । महादेव -५०७-
वंदन करूनी । म्हणाला क्षमस्व । आपली शिकार । नव्हे माझी -५०८-
स्वधर्मानुसार । वागलास त्याचे । वाउगे नसते । मानायाचे -५०९-
उद्या पहा रथ । इथेच यायचा । इंद्राचेकडून । तुजसाठी -५१०-
इतुके बोलून । झाले अंतर्धान । कुटीस अर्जुन । परतला -५११-

**(२१)**

घडला प्रसंग । केला निवेदन । सर्वांना कुटीत । इत्थंभूत -५१२-
ज्येष्ठ पांडवांनी । अनुमती दिली । पसंत नकुल । सहदेवां -५१३-
दिसते तुजला । नाही वनवास । संचितचि थोर । तुझे खरे -५१४-
ऐशा खुलाशाने । द्रौपदीने सुद्धा । प्रेमाचे बंधन । दूर केले -५१५-
इंद्राच्या सारथी । मातालीने रथ । प्रवाहाचे कांठीं । आणियेला -५१६-
क्षणैकात रथ । अमरावतीचे । द्वारीं पोहोचला । भव्य सारे -५१७-
ऐरावतानेही । स्वागताचा हार । अर्जुनाचे गळां । अर्पियेला -५१८-
सोंड उंचावूनी । वंदनही केले । गंधर्व किन्नर । अदाबास -५१९-
पंचारतीसह । अप्सरा आलेल्या । सन्मानाने नेले । महालास -५२०-
पिता इंद्रदेव । त्यांना वंदियेलें । वसूनी आसनी । बैसवीले -५२१-
जलपान आणि । नृत्यगायनाचा । समारंभ झाला । मग कांही -५२२-
इंद्राचे लक्षांत । एक गोष्ट आली । चित्ररथासह । खात्री केली -५२३-
उर्वशीचे कडे । नजरानजर । वाटते चालली । अर्जुनाची -५२४-
कारण असेल । फार फार पूर्वी । घडल्या गोष्टीची । आठवण -५२५-
त्याचे असें झालें । नर नारायण । तपासाठी गेले । हिमालयीं -५२६-
तप ढळविण्या । सौंदर्याच्या गर्वें । अप्सरांचा कंपू । तिथे आला -५२७-

नारायण तेव्हां । ठेवते जाहले । आपुल्या मांडीशी । एक फूल -५२८-
फुलांची जाहली । हीच ती उर्वशी । गर्व हरवीला । अप्सरांचा -५२९-
नर तो जो होता । तोच हा अर्जुन । असेल जाहली । आठवण -५३०-
इंद्राचे आज्ञेने । अर्जुन उर्वशी । भेट घडवली । चित्ररथें -५३१-
उर्वशी पाहून । अर्जुनाचे मनीं । आली कीं स्मरणीं । कुंतीमाता -५३२-
हा तरी जाहला । माझे यौवनाचा । अपमान ऐसे । उर्वशीस -५३३-
शाप देती झाली । पूरे एक वर्ष । रहावे लागेल । नपुंसक -५३४-
इंद्रानी म्हटले । अज्ञातवासात । कामास येईल । हाच शाप -५३५-
तिकडे वनांत । व्यासमहर्षीनी । अधूनमधून । भेट दिली -५३६-
एकटे नाहीत । आपण वनांत । भेटीने दिलासा । मिळायचा -५३७-
त्यांच्याकडे होती । गोष्टींची पोतडी । खुलवून खूप । सांगायचे -५३८-

**(२२)**

नल नामें होता । निषादांचा राजा । त्यानेही सोसले । द्‍यूतामुळे -५३९-
विदर्भ राजाची । होती राजकन्या । सौंदर्यसम्राज्ञी । दमयंती -५४०-
नलाचेही कानीं । स्तुती रुजलेली । कैसी रूपवती । दमयंती -५४१-
बागेत हिंडता । ठेवाच हंसांचा । विहार करीत । होता तिथे -५४२-
पैकी एक पक्षी । नलाचे हातासी । लागला कराया । गयावया -५४३-
सोडावे मजला । करीन तुमचे । काम जे असेल । शक्य मज -५४४-
दमयंती-मनीं । माझेविशी प्रेम । जागेलसे ऐसे । कांही कर -५४५-
दमयंती होती । सख्यांशी खेळत । हंसाने आकृष्ट । तिज केले -५४६-
एकीकडे जाता । तिच्या कवेमधे । झेप टाकियेली । हलकेच -५४७-
वा रे ऐटदार । पक्षी तूं विशेष । हंसाने म्हटले । नाही कांही -५४८-
नलराजाच्या त्या । रुबाबाशी स्पर्धा । कराया धजेल । कधी कोणी -५४९-
तुम्ही दोघे जरी । व्हाल राजाराणी । ईर्षाच वाटेल । देवांनाही -५५०-
तैसेच जाहले । जेव्हां स्वयंवर । विदर्भ राजांनी । उद्‍घोषिले -५५१-
नलराजा होता । विदर्भास जाण्या । होता निघालेला । वाटेतच -५५२-
स्वर्गातील कांही । देवांना वाटले । करावी गंमत । स्वयंवरी -५५३-
इंद्र यम अग्नि । वरुण चौघांनी । योजना आखली । कांही खास -५५४-
राजे राजपुत्र । जे जे आमंत्रित । मंडपी जाहले । स्थानापन्न -५५५-
हंसाने केलेल्या । कौतुकाप्रमाणे । नलाचा रुबाब । आगळाच -५५६-
दुरून देखूनी । दमयंतीनेही । नलाची निवड । केली मनीं -५५७-
आली दमयंती । वरमाला हातीं । ओळख देणारी । सखी साथ -५५८-
नलाचे जवळी । आलों ऐसे जरी । सखीस वाटले । गोंधळली -५५९-
समोर पाहतां । एक नव्हे पांच । एकासम एक । सारे नल -५६०-
दमयंती होती । सतर्क हुशार । चारांचे पाय कीं । अधांतरी -५६१-

चारांच्या डोळ्यांच्या । पापण्याही स्थिर । खरा नल तिने । ओळखला -५६२-
वरमाला जेव्हां । नलाचे गळ्यात । पडली जाहला । जल्लोषचि -५६३-
इंद्र यम अग्नि । वरुण यांनीही । आशिष देऊनी । दाद दिली -५६४-
पुष्कर नलाचा । भाऊ त्याची होती । कलीबरोबर । दोस्ती जणूं -५६५-
कली पुष्करास । होता म्हणालेला । नलाचे दुर्दैव । आले आहे -५६६-
नलाचे देहात । प्रवेश करेन । द्यूताचे आव्हान । दे तूं त्याला -५६७-
तेणें जिंकशील । नलाचे सर्वस्व । यथेच्छ करावें । राज्य मग -५६८-
स्वयंवराहून । स्वर्गात जाणाऱ्या । देवांची कलीशी । भेट झाली -५६९-
देवांचेकडून । माहिती मिळाली । नलदमयंती । कोठे त्याची -५७०-
राजधानीमध्ये । नलदमयंती । पोंचता करणी । करी कली -५७१-
पुष्कराने केला । प्रस्ताव नलास । आनंदोत्सवास । पट मांडूं -५७२-
बंधू पुष्कराचे । आव्हान द्यूताचे । नलास होई ना । टाळण्याचे -५७३-
सर्वस्व हरला । नल द्यूतामध्ये । करावा लागला । राजत्याग -५७४-
नेसल्या वस्त्रांनी । नलदमयंती । आश्रम शोधीत । वनीं गेली -५७५-
सोनेरी पंखांचे । तीन पक्षी आले । नलाचे समोर । भिर्भीरत -५७६-
त्यांना पकडण्या । नलाने टाकले । हलकें आपुलें । उपरणे -५७७-
चिंवचिंव करीत । पक्ष्यानी म्हटले । आम्हीच द्यूताचे । फांसे नला -५७८-
कुत्सित हंसून । उडाले घेऊन । उपरणे तेंही । नलाचे कीं -५७९-
दिवसभराची । ऐसी फरपट । झाली तेव्हां नल । मनीं म्हणे -५८०-
आपुल्या सांगाती । दमयंती सुद्धा । दुर्दैव भोगते । निष्कारण -५८१-
तिने विदर्भास । जावें पित्याकडे । मानेल परि कां । दमयंती -५८२-
नाहीच मानेल । तरी एकट्याने । जावें निघूनीया । नकळत -५८३-
दमयंती होती । निद्राधीन तेव्हां । नलाचे मनांत । घालमेल -५८४-
वनांत एकटी । सोडूनिया जाणें । नव्हते प्रेमाचे । वागणे तें -५८५-
कली दूर नेई । प्रेम परतवी । खेचाखेच ऐसी । खूप झाली -५८६-
अखेर कलीने । प्रेमावर मात । करूनी नलास । दूर नेले -५८७-
इंद्र तरी सारे । पहातच होता । संकेत धाडीला । पाताळांत -५८८-
तिथे त्याचा होता । मित्र नागराज । कर्कोटक खास । भरंवशाचा -५८९-
नलदमयंती । दोघांनाही हवी । कांही तजवीज । रक्षणाची -५९०-
दमयंती जेव्हां । झोपेतून जागी । झाली तो पाहते । एकटीच -५९१-
पाहीले नलास । साद देऊनिया । उत्तर कोठून । नाहीं आलें -५९२-
थट्टेसाठी सुद्धा । लपंडाव खेळ । खेळण्याची वेळ । नव्हती ही -५९३-
नल कधी नाहीं । असें करणार । कुणाची करणी । ही तो खास -५९४-
ज्याने ऐसे केले । भोगेल तो नक्की । नरकयातना । शाप वदे -५९५-
अशोकवृक्षास । केली प्रदक्षिणा । निघाली दिसल्या । वाटेवरी -५९६-

वाटेत भेटला । वल्कलधारीसा । वृद्ध हाती कांठी । घेतलेला -५९७-
त्याने सल्ला दिला । पित्याकडे जा तूं । नलाचा तपास । काढील तो -५९८-
नंतर भेटला । लमाणांचा तांडा । त्यांच्यासवे आली । चेदीमध्ये -५९९-
इतुकें सौंदर्य । आहे स्त्रीचे जरी । लक्तरे नेसली । वेडी काय -६००-
कुणाच्या मनांत । ऐसे कांही येतां । दगड तिजला । मारियेला -६०१-
लोकांचा गलका । वाढतच गेला । कठीण प्रसंग । ऐसा आला -६०२-
सुदेव नांवाच्या । ब्राह्मणाने मात्र । आडोसा देऊन । वांचवीले -६०३-
राजाकडे त्याने । मग तिला नेले । राजाने अभय । तिला दिले -६०४-
व्यवस्था करून । राजाने तिजला । नंतर धाडीले । विदर्भास -६०५-
दमयंती तेव्हां । मातेस म्हणाली । जोंवर भेटत । नाही नल -६०६-
नेसेन चिंधीच । खंत याची कांही । नको वाटूं द्यावी । विनविते -६०७-
पिता भीमराज । यांनी आश्वासिले । पाठवितो हेर । तपासास -६०८-
दमयंतीनेही । परवलीसाठी । संकेत दिधला । कांही ऐसा -६०९-
नशीबाचा डाव । खेळण्याचा छंद । करणारा दूर । प्रेमाहून -६१०-
तिकडे वनात । वणवा लागला । दिशाहीन झाला । नल तेव्हां -६११-
किर्र झाडीतून । हांक कुणी दिली । नलास वाटले । तैसे कांही -६१२-
साप कर्कोटक । होता निपचित । वेटोळेही कांही । अस्ताव्यस्त -६१३-
त्यानेच हांक ती । होती ना दिलेली । नलास म्हणाला । कर्कोटक -६१४-
उचलून मज । नेशील बाजूला । करेन मदत । साभार मी -६१५-
नलाने सापास । उचलून नेतां । नलास लागला । सुळा काय -६१६-
विष भिनल्याने । नल अष्टावक्र । विद्रूपही झाला । अनोळखी -६१७-
कर्कोटक देई । कांहीसे सांत्वन । अनोळखीपण । हिताचेच -६१८-
तुझ्या शरीरात । आहे जो शिरला । तिळ्तीळ जळेल । विषामुळे -६१९-
सध्या अयोध्येस । जाऊनी करावे । सारथ्य तेथील । राजाकडे -६२०-
आणिक ह्याही घे । रेशमाच्या पट्ट्या । जादुई आहेत । जपाव्यात -६२१-
योग्य वेळ येतां । पट्ट्या बांधल्याने । मूळ रूपामध्ये । येशील कीं -६२२-
अयोध्येत राजा । ऋतुपर्ण याने । सारथ्याचे काम । दिले सुद्धा -६२३-
नलास एकदा । भेटला ब्राह्मण । पर्णद नांवाचा । सहजीच -६२४-
म्हणाला कोड्यात । गुन्तलेसे मन । गेले किती दिन । सतावते -६२५-
नलाने पुसिले । ऐसे कैसे कोडे । आहे तरी काय । सांगावे ना -६२६-
दमयंतीने जो । परवलीसाठी । संकेत दिलेला । तेंच कोडे -६२७-
नशीबाचा डाव । खेळण्याचा छंद । करणारा दूर । प्रेमाहून -६२८-
नलाने म्हटले । छंदिष्ट पाहतो । वेळ बदलतो । केव्हां त्याची -६२९-
हें तो मज कांही । ध्यानीं नाही आले । वाटते सुटला । गुंता जणू -६३०-
आभार मानूनी । संवाद संपला । पर्णद निघाला । विदर्भास -६३१-

कुंडीणापुरात । दमयंतीलागी । सांगीतले सारे । वर्तमान -६३२-
पहेली कितीक । लोकांना पुसली । वाटते उत्तर । अयोध्येत -६३३-
पिता भीमराज । यांना ना यातील । कांही सांगायाचे । बजावले -६३४-
ब्राह्मण सुदेव । याला राजदूत । म्हणूनी धाडीले । अयोध्येस -६३५-
राजा ऋतुपर्ण । यांना आमंत्रण । स्वयंवरा यावें । विदर्भास -६३६-
दमयंतीसाठी । पुन्हा स्वयंवर । उद्याच सकाळी । ठरलेले -६३७-
सारथी नलास । राजाज्ञा जाहली । पोहोचणे आहे । विदर्भास -६३८-
ऐशा वेगें रथ । तूंच वाहशील । म्हणोनिया कष्ट । तुज देतो -६३९-
रथाची पाहूनी । गती ती अफाट । ऋतुपर्ण म्हणे । नलालागी -६४०-
लोक म्हणतात । माझीही अफाट । आकडेमोडीत । गती आहे -६४१-
आता इतुक्यांत । मोजली मी फळे । किती समोरील । वृक्षावरी -६४२-
दोन हजार नि । पंचाण्णव संख्या । गिनती जाहली । क्षणार्धात -६४३-
बसविले आहे । कांहीसे इंगित । द्यूताचे डावही । जिंकण्यास -६४४-
विश्रांती घेण्यास । थांबले असतां । करार जाहला । एकमेकां -६४५-
रथ हाकण्याची । खुबी वाहकाने । सांगावी राजास । बदल्यात -६४६-
फाशांचे हुकमी । दान पाडण्याचे । इंगित सांगावे । सारथ्यास -६४७-
रंगात आलेल्या । राजाने इंगित । फाशांचे लगेच । सांगितले -६४८-
नलाच्या शरीरी । विषाने बेजार । झालेला बाहेर । कली आला -६४९-
अदृश्य कलीने । नलाचे कानांत । केली कुजबुज । क्षमेसाठी -६५०-
त्रास खूप दिला । आता वर देतो । अजरामर तूं । होशील गा -६५१-
जो कोणी तुझे हें । चरित्र ऐकेल । त्यासही ना कली । सतावेल -६५२-
पुढील वाटेत । नलाने राजास । खुबी सांगितली । सारथ्याची -६५३-
कुण्डीणापुरात । पोंचता दिसेना । कांहीही तयारी । स्वयंवरा -६५४-
ऋतुपर्णालागी । स्वागत करीत । पुसीते जाहले । भीमराज -६५५-
आता इकडे हें । येणें अचानक । सावध उत्तरे । ऋतुपर्ण -६५६-
जावयाचे होते । कांही दक्षिणेस । जाहले स्मरण । आपलेही =६५७-
सारथी एव्हाना । घोडयांना घेऊन । अश्वशाळेमध्ये । गेला होता -६५८-
केशिनीने तिथे । गाठून पुसीले । अयोध्येहून कां । आले भले -६६०-
इतुके अंतर । एकाच रात्रीत । वेग हा आपला । कमालीचा -६६१-
अयोध्येत म्हणे । आहे ऐसा कोणी । पत्नीला वनात । सोडलेला -६६२-
नल उत्तराला । ऐशा त्या येड्याच्या । पत्नीने करावे । काय बरें -६६३-
तिने स्वयंवर । मांडिलें पुनश्च । दूषण कां द्यावें । तिला तरी -६६४-
असेल त्याचीही । कांही मजबूरी । राहावे लागते । अनोळखी -६६५-
केशिनीने दिला । लगेच खुलासा । ओळख आपली । पटलीसे -६६६-
दमयंतीनेच । बहाणा रचिला । आपण यावेत । म्हणोनिया -६६७-

कर्कोटकाने ज्या । दिल्या होत्या पट्ट्या । स्मरण करूनी । बांधियेल्या -६६८-
दमयंती आली । पुनर्मीलनाने । अंधारी बुडाला । भूतकाळ -६६९-
पाहूनि नलास । राजा ऋतुपर्ण । मनी समजला । दैव कैसे -६७०-
भीमराजानाही । खुलासा मिळाला । दैवाच्या खेळाची । प्यादी सारे -६७१-
ऋतुपर्ण मग । स्वतःच सारथ्य । करीत पोंचला । अयोध्येस -६७२-
सुदेव ब्राह्मण । धाडीला निषादा । द्यूताचे आव्हान । पुष्करास -६७३-
फाशानी कसला । नाही दगा दिला । सर्वस्व परत । नलाकडे -६७४-
नलदमयंती । आख्यान हे ऐसे । व्यासांनी कथिले । पांडवांना -६७५-
आणिक म्हटले । खोड नियतीची । घेते ती परीक्षा । सर्वांचीच -६७६-

**(२३)**

एके रात्री एक । हरीण भेटले । धर्माचे स्वप्नात । काकुळती -६७७-
आपुला जरी कां । उदरनिर्वाह । नीट होतो इथे । राहण्याने -६७८-
अमुचा कळप । होईल गारद । राहाल असेच । जरी इथे -६७९-
सकाळी धर्मानी । सर्वांना कथिले । स्वप्नात हरीण । म्हणाला जें -६८०-
भीमाने म्हटले । योग्यच वाटते । कळकळ जरी । स्वप्नातील -६८१-
नाही तर कांही । मनकणकाच्या । गोष्टीसारखेच । व्हावयाचे -६८२-
द्रौपदीस झाले । कुतूहल तिने । म्हंजे काय झाले । विचारले -६८३-
मनकणक हा । जरी होता दैत्य । एकदा लहर । त्यास झाली -६८४-
गवतपालाच । खाऊनी राहीला । किती तरी वर्षे । निश्चयाने -६८५-
एकदा सहज । जखम जाहली । गवताचा रस । नसेतून -६८६-
आश्चर्य पाहूनी । मनकणकास । हर्षवायू जणू । संचारला -६८७-
गवतपालाच । जरी खात होता । राक्षस नाचाया । लागलेला -६८८-
पृथ्वी हादरते । पाहूनी सचिंत । झाले ऋषीमुनी । देवगण -६८९-
शंभूंकडे गेले । त्यांनी राक्षसास । विचारले कां रे । नाचतोस -६९०-
मनकणकाने । जखम दाविली । म्हणे नव्हे काय । आश्चर्य हें -६९१-
शंकरांनी तेव्हां । स्वतःचे हातात । नख खुपसून । दाखविले -६९२-
नसेनसेतून । भस्मच निघते । अतिसेवनाने । होते ऐसे -६९३-
मनकणकही । वरमला त्यानें । क्षमा मागितली । शंकरांची -६९४-
धर्माने म्हटले । वनवासासाठी । एकाच ठिकाणी । नको आता -६९५-
अर्जुन एव्हाना । परताया हवा । त्याचीच वाट मी । पाहताहे -६९६-
क्षात्रतेज त्याचे । असो अबाधित । प्रभावानंतर । उर्वशीच्या -६९७-
द्रौपदीची पृच्छा । कोण ही उर्वशी । तिला धीर देत । सांगितले -६९८-

**(२४)**

उर्वशी आहे ती । एक देवांगना । तिच्यामुळे झाला । ऋष्यश्रुंग -६९९-
त्याचाही खुलासा । करण्यास सारी । धर्मांनी कहाणी । सांगितली -७००-

होता विभंडक । ऋषींचा आश्रम । अंगदेशामध्ये । नदीकाठी -७०१-
स्नानास आलेल्या । ऋषींना दिसली । समोर उर्वशी । नहाताना -७०२-
शुक्रजंतू त्यांचा । पाण्यात पडला । हरिणीचे मुखी । गेला पुढे -७०३-
हरिणीचे पोटी । बाळ कीं जन्मला । त्याचे डोक्यावर । शिंग होते -७०४-
विभंडकानीच । ऋष्यश्रुंग नांव । ठेऊनी आश्रमीं । वाढवीला -७०५-
एके वर्षी परि । अंगदेशामधे । दुष्काळ पडला । अवर्षणे -७०६-
राजधानीमध्ये । चंपानगरीत । राजा लोमपाद । चिंतातुर -७०७-
कोणी एक वृद्ध । राजास म्हणाला । कांही वर्षांपूर्वी । पाहिले जे -७०८-
कौशिकी नदीच्या । तीरी हरिणीने । शिंगवाल्या बाळा । जन्म दिला -७०९-
आता तो असेल । मोठा जरी झाला । असेल अजून । निरागस -७१०-
ऐशा त्या मुलाने । प्रार्थना करावी । वरुणदेवाची । सर्वांतर्फे -७११-
पाऊस पडेल । दुष्काळ मिटेल । श्रद्धा ऐसी माझी । वृद्ध म्हणे -७१२-
राजकन्या शांता । हिने पत्करली । मुलाला आणणे । शोधूनीया -७१३-
तपास काढता । तिला समजले । विभंडकाश्रमी । ऋष्यश्रुंग -७१४-
पर्णकुटीमध्ये । मुनी नसतांना । शांतेने कुटीत । डोकावले -७१५-
ऋष्यश्रुंगाने तो । पाहिली नव्हती । मुलगी एकही । आजवरी -७१६-
तरीही शांतेने । धीराने विश्वास । ऋष्यश्रुंगमनीं । रुजविला -७१७-
ऋष्यश्रुंग होता । मोहित झालेला । शांतेच्या मधुर । बोलण्याने -७१८-
दुसरे दिवशी । शांता पुन्हा आली । तिच्यासवे जाण्या । राजी झाला -७१९-
चंपा नगरीत । दोघेही पोचण्या । आधीच आकाशी । ढग आले -७२०-
अमाप पर्जन्य । वर्षला शेतात । पिके तरारली । आश्विनात -७२१-
लोमपादानेही । निम्मा राजवाडा । ऋष्यश्रुंग शांता । यांना दिला -७२२-
त्यांच्या विवाहात । आशीर्वाद देण्या । विभंडक जरी । आले होते -७२३-
ऐष-आरामाने । कार्य कीं नासतें । आश्रमास गेले । परतून -७२४-
आपणही जाऊं । चला कैलासास । सुचवीता झाला । युधिष्ठिर -७२५-

**(२५)**

कैलासाजवळी । ऋषभ शिखरा । पोचण्याचे आधी । बजावले -७२६-
ऋषभ मुनींनी । इथे तप केला । इथे ना खपतो । शांतिभंग -७२७-
त्यांनी पर्वताला । होते सांगितले । आवाज करेल । कोणीही कां -७२८-
सुसाट वाऱ्याने । पत्थरांचा मारा । करून पाठवी । भर्कटून -७२९-
ऋषभ मुनींनी । तप संपवीला । त्याला जरी झाली । खूप वर्षे -७३०-
पर्वत अजूनी । आज्ञा ती पाळीतो । म्हणूनी चालावे । मूकपणे -७३१-
ऋषभ पर्वत । ओलांडूनी मग । कैलासाजवळी । विसावले -७३२-
एकदा द्रौपदी । एकटीच होती । ओसरीवरती । बसलेली -७३३-
ईशान्येकडील । वाऱ्याबरोबर । आले एक फूल । पदरांत -७३४-

सहस्र दलांचे । श्वेतकमल तें । भीमास दाविले । तिनें फूल -७३५-
कोठून फूल तें । आले त्याचा शोध । घेण्याचे भीमाचे । मनीं आलें -७३६-
शोध लागल्यास । आणीकही फुलें । मिळतां द्रौपदी । सुखावेल -७३७-
कांही दूर गेला । वाटेत वानर । निवांत आडवा । झोपलेला -७३८-
ऐसे हें वाटेत । आडवे झोपणे । शोभतें कां तुम्हां । महाशय -७३९-
म्हातारा झालो ना । डोळा कीं लागला । तूंच जा शेपटी । हलवून -७४०-
भीमाने प्रथम । पाहिले सहज । हाताने हलकें । ढकलून -७४१-
मग लावियेला । ताकदीने जोर । नाही तसूभर । हालत ती -७४२-
दमलास कां रे । ऐसे म्हणूनियां । वानर उठला । मोठा झाला -७४३-
भीमाने लगेच । तेव्हां ओळखले । दर्शन देताती । हनुमंत -७४४-
जडत्व गुरुत्व । सिद्धी दावूनिया । परीक्षा पाहिली । माझी बरी -७४५-
नमन करूनी । भीमाने म्हटले । तुम्ही ज्येष्ठ बंधू । मजलागी -७४६-
प्रणामही घ्यावा । क्षमा असो द्यावी । ओळखण्या वेळ । लागला ना -७४७-
आयुष्मन्त भव । माहीत मजला । वनवास तुम्हां । चालू आहे -७४८-
आपण निघाले । फुलें जी शोधीत । डोंगरापल्याड । तलावांत -७४९-

**(२६)**

कैलासावरून । नजर टाकतां । दिसला मानस । सरोवर -७५०-
शिखरावरती । वीज चमकली । सहजी तिकडे । दृष्टी गेली -७५१-
रत्नजडितसे । एक महाद्वार । बंद होतानांचा । प्रकाश तो -७५२-
ऐश्वर्याधिपती । वैश्रवण यांच्या । कोठडीचें कीं तें । महाद्वार -७५३-
द्वारपाल आणि । भीम यांची झाली । नजरानजर । क्षणभर -७५४-
द्वारपाला झाले । आश्चर्य कांहींसें । मानव मानसी । आला कैसा -७५५-
द्वारपालाने तें । निवेदन केलें । मणिभद्राना ते । यक्षराज -७५६-
दोघांनी मिळून । स्वतः वैश्रवण । यांना ती खबर । सांगितली -७५७-
हवेत उडत्या । आसनावरून । भीमाचे समोर । आले स्वतः -७५८-
नाही कां माहीत । इथे बंदी आहे । कोणी मर्त्य जीव । येऊं नये -७५९-
ऐशा प्रमादाचे । आता प्रायश्चित्त । सत्वर देहान्त । करावे गा -७६०-
परंतु भीमाने । एकाच श्वासाने । उडवून दिलें । उपरणें -७६१-
वैश्रवणानेही । लगेच ताडले । हा तो आहे भीम । वायुपुत्र -७६२-
तेव्हां पुसियेले । भीमा तुज येथें । येण्यास कारण । काय झालें -७६३-
तसे तर आम्ही । बदरी ऋषींच्या । आश्रमाशी वास । केला आहे -७६४-
इंद्रपुरीहून । अर्जुन येण्याची । प्रतीक्षा करीत । इथे आलों -७६५-
इकडून आलें । सहस्र दलांचे । श्वेतकमळ ना । तिथवर -७६६-
त्याचा शोध घेत । आलो ना इकडे । पहावें आणीक । मिळतील -७६७-
इतकेंच होय । म्हणत हाराच । मणिभद्राहातीं । देववीला -७६८-

(२७)

मातालीने रथ । उतरविला ना । सरली अकरा । वर्षे होती -७६९-
पांडवांनी मग । कामाख्य वनांत । बांधली साधीच । पर्णकुटी -७७०-
समोरच होते । द्वैतवन तेथें । महाल बांधणें । सुरू होतें -७७१-
दुर्योधनानेच । केलेली कागाळी । पांडवांना जणूं । खिजविण्या -७७२-
बांधकाम होते । मजूर लाविले । गेले पाणी पिण्या । सरोवरीं -७७३-
गंधर्वांनी परि । त्यांना अडविलें । पाहून चिडला । दुर्योधन -७७४-
गंधर्वांना म्हणे । धृतराष्ट्रांचा मी । ज्येष्ठ राजपुत्र । ठावें नाहीं -७७५-
माझ्या या लोकांना । मनाई करेल । शिक्षेस तो पात्र । समजावें -७७६-
परि गंधर्वांनी । मायावीपणानें । खूप मोठे केलें । सैन्य त्यांचे -७७७-
दुर्योधनावर । धांवाही बोलला । सावध जाहला । कर्ण तेव्हां -७७८-
डोळे दिपवित्या । किरणांचा तट । करूनी गंधर्व । थोपवीले -७७९-
स्वतः चित्ररथ । दाखल जाहला । कर्णाचा मोडीला । रथ त्याने -७८०-
लोखंडी सांपळा । रचून तयांत । अधांतरी केला । दुर्योधन -७८१-
कांही कुरुजन । धर्माकडे आले । याचना करीत । मदतीची -७८२-
अर्जुने रचिला । बाणांचा सांपळा । गंधर्व बंदिस्त । त्यांत केले -७८३-
तेव्हां चित्ररथ । धर्मास म्हणाला । दुर्योधनाचीच । खोडी सारी -७८४-
तरीही जाणावे । एकशे नि पांच । आम्ही सारे कुरु । नव्हेत कां -७८५-
असो तुम्ही सोडा । गंधर्व आणिक । मी पण सोडेन । दुर्योधन -७८६-
जाळ्यातून खाली । उतरण्या हात । दुर्योधनालागीं । धर्म देती -७८७-
साऱ्या प्रकाराने । खजील होऊन । घुश्शातच गेला । दुर्योधन -७८८-

(२८)

ऐशा जगण्यात । काय तें स्वारस्य । विचारात मग्न । दुर्योधन -७८९-
तेव्हां कालीमाता । आली स्वप्नामधे । म्हणाली निराश । झाला कां रे -७९०-
तुझा अर्धा देह । आहे ना टणक । हिऱ्याचे सारखा । मीच केला -७९१-
नाहीच सामर्थ्य । एकाही शस्त्राचे । तुला मारण्याचे । तरी ऊठ -७९२-
हस्तिनापुरास । जेव्हां परतला । दुःशलेचे लग्न । सजलेले -७९३-
सिंधु या देशाचे । राजे जयद्रथ । जामात जाहले । कौरवांचे -७९४-

(२९)

एके दिनी कांही । अन्न न शिजले । उपाशी पांडव । सारे होते -७९५-
आणि सांजवेळी । दुर्वास आले कीं । आणिकही मुनी । साथ होते -७९६-
अतिथीधर्म तो । कैसेनी निभावा । कठीण प्रसंग । ओढवला -७९७-
द्रौपदी सहज । स्वतःशी म्हणाली । कृष्णा केशवा रे । काय करूं -७९८-
मनांत विचार । नुस्ता उमटला । धापा टाकीतच । कृष्ण तिथे -७९९-
एकाएकी मज । कां गे आठवले । दमछाक झाली । येतायेतां -८००-

लगोलग कांही । आण खावयास । तीच तर आहे । पंचाईत -८०१-
खोटे कां बोलते । भात ज्यांत केला । पहा त्या भांड्यात । शीत आहे -८०२-
स्वतःचे हातांत । भांडे घेऊनीया । श्रीकृष्ण करती । पुटपुट -८०३-
चंद्राचे चांदणे । हास्य तेंच तुझे । पृथ्वी नि आकाश । तुझी माया -८०४-
प्रलयाचे आधी । अग्नीस सांगोनि । भाजून काढसी । सारी धरा -८०५-
ऐसे झाल्यावरी । वीज कडाडते । जलमय होते । पृथ्वी सारी -८०६-
वायूस घेऊनी । पोटामध्ये तेव्हां । जलाशयात त्या । पहुडसी -८०७-
शेषासनी जेव्हां । डोळे उघडसी । कांहीसा आठव । तुज येतो -८०८-
हात बुडवूनी । काढूनी पृथिवी । शेषफण्यावरी । ठेवीसी तूं -८०९-
शेष डोलवीतो । फणा जेव्हां त्याने । संसार होतसे । प्रचलित -८१०-
नाही कां म्हणत । शेषास तूं तेव्हां । फुलू दे संसार । डोलूं नको -८११-
हेंच जरी सत्य । तरी या विश्वाची । होऊं दे कणाने । पोटपूजा -८१२-
म्हणून स्वीकार । व्हावा या कणाचा । म्हणत टाकले । मुखी शीत -८१३-
द्रौपदीस कांही । नाही समजले । कृष्णाने केलेली । पुटपुट -८१४-
बाहेर जाऊनी । द्रौपदी बोलली । अर्जुनास घरी । नाही कण -८१५-
अर्जुन बोलला । नको त्याची चिंता । सर्वांनी ढेकर । दिली पहा -८१६-
व्यासश्री आहेत । कथा सांगणार । निवांत इथेच । बैस आता -८१७-

**(३०)**

व्यासांनी मांडिले । कथानक नवें । रसाळ आणिक । उद्बोधक -८१८-
मद्रदेशी राजे । अश्वपती यांची । घेऊनी संमती । राजकन्या -८१९-
सावित्री निघाली । स्वतःचा स्वतःच । पती शोधण्यास । प्रवासास -८२०-
परत येऊनी । पित्यास म्हणाली । पसंत मजसी । सत्यवान -८२१-
शल्बदेशी राजे । होते द्युमत्सेन । पदच्युत झाले । कालवशे -८२२-
सत्यवान त्यांचा । जरी राजपुत्र । वनांत राहती । सध्या सारे -८२३-
मंत्र्याने कपट । करूनी सर्वांना । लावियेले आहे । देशोधडी -८२४-
सारे ऐकूनियां । अश्वपती यांना । चिंताच जाहली । सावित्रीची -८२५-
अधिक तपास । केला ज्योतिषाचे । गुणमेलनही । करविलें -८२६-
सत्यवान होता । अल्पायुषी त्याने । आणीकचि चिंता । बळावली -८२७-
सावित्रीस जरी । खूप समजाविले । मीच ना वरले । माझे भाग्य -८२८-
चिंतीत मनाने । व्याही आमंत्रून । विवाह जाहला । सावित्रीचा -८२९-
विवाहानंतर । एकच वर्ष कीं । सत्यवान होता । जगणार -८३०-
एकेक करीत । जाते झाले दिन । शेवटचा तोही । उजाडला -८३१-
लाकडे आणण्या । आज सावित्रीही । सत्यवानासंगें । वनी गेली -८३२-
वाळल्या झाडाची । कांहीशी लाकडे । तोडून जाहली । इतक्यांत -८३३-
थोड्याच श्रमाने । थकवासा आला । घामही फुटला । दर्दरून -८३४-

सांवरती झाली । सावित्री पतीस । डोक्यास मांडीचे । उसे दिलें -८३५-
घाम पुसतांना । भास तिला झाला । कुणी जवळीच । आले आहे -८३६-
हिर्वट कांतीची । रक्तवस्त्रधारी । धिप्पाड ती व्यक्ती । यम नक्की -८३७-
धैर्याने म्हणाली । देवा नमस्कार । सत्यवानपत्नी । सावित्री मी -८३८-
जाणतो ना मी तें । म्हणत यमाने । आत्मा हरपला । अंगुष्ठसा -८३९-
पाशांत ठेऊनी । निघाले परत । सावित्रीने प्रेत । अलगद -८४०-
खाली ठेऊनिया । निश्चय करूनी । यमामागोमाग । निघाली ती -८४१-
बोलते करावे । यमास म्हणूनी । स्वतःच म्हणाली । कांही ऐसे -८४२-
ऐकलेले मी कीं । पतीचे आधीच । मेल्यास पत्नीस । अमरत्व -८४३-
खरे आहे परि । इथूनिया पुढे । नाही यावयाचे । माझ्यामागें -८४४-
जन्मल्यानंतर । केव्हांतरी सर्वा । यावयाचे आहे । तुम्हां मागे -८४५-
अनुमती व्हावी । आणीकही थोडे । आपुलें सौहार्द । मिळावें ना -८४६-
सत्यवानप्राण । तेवढे सोडून । इतर कांहीही । माग वर -८४७-
होवोत डोळस । राजे द्युमत्सेन । यमाने तथास्तु । वर दिला -८४८-
अजूनही थोडी । येऊं कां विनंती । यमांनी दिधली । अनुमती -८४९-
आणीक म्हणाले । मरण म्हणजे । सर्वस्वाचे दान । समजावें -८५०-
देण्यायोग्य कोणी । व्यक्ती भेटल्यास । आनंदचि होतो । माग वर -८५१-
माझ्याही पित्यास । पुत्रलाभ होवो । यमांनी दिधला । तोही वर -८५२-
यमांनी म्हटले । स्वतःसाठी परि । नाही मागितले । कांहीच तूं -८५३-
मागते मजला । सत्यवानासंगे । मिळूं दे संतती । द्यावा वर -८५४-
सत्यवान तरी । आहे गतप्राण । ऐसा वर तरी । साध्य कैसा -८५५-
त्यांची मी अर्धांगीं । त्यांच्या मरणानें । आयुष्य जाहले । अर्धे माझे -८५६-
अर्ध्यांशा मजला । आतां मजेसाठी । स्वर्गही मागणें । अनुचित -८५७-
तूं तरी मजला । पेचांत टाकलें । समत्वचि खरा । धर्म माझा -८५८-
तुझ्या उरलेल्या । आयुष्याचे अर्धे । देशील मजला । काय देवी -८५९-
तत्पर सावित्री । म्हणाली मी दिलें । तेंच सत्यवाना । देतो तरी -८६०-
समान आयुष्य । दोघेही जगाल । व्यवस्था ही नीट । समत्वाची -८६१-
वंदन करूनी । पुनश्च यमांना । सावित्री जागेस । परतली -८६२-
गाढ निद्रेतून । जागे व्हावे तैसे । नेत्र उघडले । सत्यवानें -८६३-
घरी परतली । द्युमत्सेन पाही । स्वतःचे डोळ्यांनी । स्पष्ट सारे -८६४-
शल्बाहून दूत । सांगण्यास आला । बीमोड जाहला । घातक्यांचा -८६५-
सिंहासनी व्हावें । पुनश्च आरूढ । अगत्य करीते । प्रजा सारी -८६६-
सावित्रीचे ऐसे । पातिव्रत्यतेज । आदर्श जाहलें । कालत्रयीं -८६७-
द्रौपदीस तेव्हां । व्यासांनी म्हटलें । तुझेही तसेच । सक्षम गे -८६८-

एका हरिणाने / शिकारीचे वेळी / साऱ्या पांडवांना / दमविले -८६९-
तृष्णा शमविण्या / पाणी शोधावया / नकुल चढला / झाडावरी -८७०-
सरोवर एक / दिसले तिकडे / पाणी आणावया / मग गेला -८७१-
खूप वेळ परि / नाही परतला / त्याचेमागे गेला / सहदेव -८७२-
तोही नाही आला / तेव्हां काळजीने / धर्माने धाडीले / अर्जुनाला -८७३-
अर्जुनास कोठे / ठेवील डांबून / ऐसा त्रिजगती / नाही कोणी -८७४-
तोही विश्वास कां / विफल ठरला / प्रकार पहाया / भीम गेला -८७५-
धर्माने म्हटले / मोजेन शंभर / नाहीतरी आलो / मीही पाठी -८७६-
जावेच लागले / युधिष्ठिरासही / दृश्य पाहूनिया / चक्रावला -८७७-
चारी भाऊ त्याचे / होते पडलेले / मृतवत त्यांना / काय झाले -८७८-
पाणी शिंपडून / पाहूं उठविण्या / म्हणूनिया गेला / पाण्याकडे -८७९-
पाण्यात जैसा कां / हात घालणार / अदृश्य वाणीने / बजावले -८८०-
सरोवर आहे / माझ्या मालकीचे / प्रश्नांची उत्तरें / आधी द्यावी -८८१-
तुझ्या भावंडांनी / औद्धत्य केल्याने / त्यांना विषबाधा / झाली आहे -८८२-
आहे हें उदक / विष वा अमृत / द्यावी कां उत्तरें / ठरवावें -८८३-
धर्माने म्हटलें । विचारावे प्रश्न / देवदत्त ऐसा / मित्र कोण -८८४-
धर्म उत्तरले / देवदत्त असे /पत्नी तीच मित्र / सर्वकाळ -८८५-
पोषण करते / पृथ्वी कीं सर्वांचे / तिच्याहून श्रेष्ठ / आहे कोणी -८८६-
मातृतुल्य नाही / कोणीही म्हणून / पृथ्वीहून माता / सदा श्रेष्ठ -८८७-
स्वर्गाहून उच्च / स्थान बा कोणाचे / पिता वंदनीय / स्वर्गाहून -८८८-
वायूहून वेग / अधिक कोणाचा / मनोवेगा नाही / तुलनाच -८८९-
कुरणांमधील / गवतांची पाती / त्याहून असंख्य / कोण असे -८९०-
मनांत उठती / असंख्य विचार / गणना तयांची / अशक्यचि -८९१-
जन्मले तरीही / निश्चल राहते / ऐसे जनन तें / कोणतें गा -८९२-
अंडज जन्मती / परंतु निश्चल / उबेशिवाय ना / जीवरूप -८९३-
नाहीच कोणास / पाझर फुटत / नसते हृदय / पाषाणास -८९४-
जीवनाचा खरा / आधार कोणता / सृष्टी बहरते / पर्जन्याने -८९५-
व्याधीग्रस्तालागी / खरा मित्र कोण / सौहार्दपूर्णसा / भिषग्वर -८९६-
मरणसमयी / खरा मित्र कोण / वृत्तीच असावी / समाधानी -८९७-
आतिथ्य करूनी / कोणें उपकृत / सारी जीवसृष्टी / केली असे -८९८-
अग्निदेवतेने / केले ना आतिथ्य / म्हणूनी सन्मान्य / अग्निहोत्र -८९९-
विश्वाची रचना / कैसी झाली आहे / विश्वात भरले / काय आहे -९००-
मोठ्या पोकळीत / विरळशी हवा / ब्रह्मानें रचिलें / विश्व ऐसे -९०१-
एकटा सदैव / प्रवास करीतो / विसावा मुळीच / कोणा नाही -९०२-
रथ एकचाकी / घोडे तरी सात / पांगळा सारथी / सूर्यदेवा -९०३-

पुनर्जन्म कोणा / वारंवार होतो / शुक्लप्रतिपदी / जन्मे चंद्र -९०४-
सर्वथैव योग्य / स्तुति ती कशाची / कौशल्याची स्तुति / योग्य खरी -९०५-
धनामध्ये श्रेष्ठ / धन तें कोणतें / ज्ञानसंपदा ती / श्रेष्ठ धन -९०६-
गमावेपर्यंत / फिकीर न वाटे/ दुर्लक्ष घडते/ कोणाकडे -९०७-
निरोगी राहण्या/ करावी लागते/ मेहनत तें ना/ समजतें -९०८-
सांगावें कशांत / खरें सुख आहे/ समाधानासम / सुख नोहे -९०९-
काय टाकल्याने/ येतसे श्रीमंती/ लोभ धरण्यांत / भिक्षावृत्ती -९१०-
लोभाचा असतो/ परिणाम कैसा/ लोभ किं असतो/ विषासम -९११-
जगाचा उद्धार / केव्हां बा कठीण / अंधारात जग / बुडल्यास -९१२-
सांवरणे केव्हां / असतें कठीण / संताप झाल्यास / अनावर -९१३-
म्हणावे वर्तन / कैसे प्रामाणिक / सर्वांभूतीं जरी / समानता -९१४-
प्राणिमात्रांमधे / समान तें काय / जगण्याची इच्छा / सर्वांनाच -९१५-
कोणती स्वस्थता / भ्रामक असते / जाचक शासन / नसावेच -९१६-
फसगत होते / माणसाची केव्हां / मित्रत्व जर कां / मतलबी -९१७-
कशाने येतसे / मित्रत्वास बाधा / मित्रत्व नासते / मत्सराने -९१८-
सुदैव म्हणजे / काय तें असतें / प्रामाणिकतेचे / बक्षीस तें -९१९-
प्रामाण्य वागणें / कसें बा असतें / नव्हेच प्रामाण्य / निर्दयीता -९२०-
दंभ म्हंजे काय / धर्माचरणाचे / नियम सांगणें / इतरांना -९२१-
खरा सुखी कोण / अऋणी माणूस / आश्चर्य कोणतें / सर्वाधिक -९२२-
रोज येई मृत्यू / असंख्य जीवांना / वाटते सर्वांना / जगेन मी -९२३-
युधिष्ठिरा खूप / मजा आली पहा / तुझा पिता मीच / यक्षरूपें -९२४-
भावंडें तुझी ही / नेई सांभाळून / जागवितो त्यांना / निद्रेतून -९२५-
अर्जुन गांडीव / उचलूनी म्हणे / आणतो शिकार / इतुक्यांत -९२६-
एकेक हरीण / प्रत्येकाचे साठी / त्यावरी हंसला / सहदेव -९२७-
इतुकी सावजे / घेऊनी आपण / कोठे कैसे जाऊं / चिंता हवी -९२८-
उद्याचे रात्रीस / आपणांसी आहे / अज्ञातवासाची / सुरवात -९२९-
सहदेव होता / ज्योतिर्विद खासा / कालमापनाचे / काम त्याचे -९३०-
दुर्योधनाने कीं / हेर पेरलेले / अंदाज होताच / पांडवांना -९३१-
कामाख्य सोडूनी / यमुनेच्या पार / मत्स्यदेशी आले / विराटाच्या -९३२-
(३२)
नदीचे कांठीच / स्मशानाजवळी / देखीला शमीचा / वृक्ष मोठा -९३३-
स्मशानाजवळी / वर्दळ केवळ / प्रेतदहनास / येणाऱ्यांची -९३४-
शमी वृक्ष आणि / मानती पवित्र / शस्त्रें राहतील / व्यवस्थित -९३५-
अश्वरोहणात / निपुण नकुल / सहजी चढला / झाडावरी -९३६-
करूनिया मोळी / बांधीली शस्त्रांची / पानांच्या फांद्यानी / झाकियेली -९३७-

युधिष्ठिर गेला / राजदरबारी / जनसभेमधे / शिरुनीया -९३८-
विराटाचे लक्ष / सहज पडेल / ऐशीच जागाही / पकडली -९३९-
सभा आटोपूनी / जातांना राजाने / नेमके धर्मास / बोलाविले -९४०-
पुसीले राजाने / कांही काम होते / युधिष्ठिर म्हणे / अदबीने -९४१-
ब्राह्मण मी कंक / द्यूताची आवड / विशेषसे डाव / बसविले -९४२-
क्रीडागारामध्ये / पट रंगलेला / राजाचे दृष्टीस / भीम आला -९४३-
कंकाने मारली / बल्लवास हांक / खांद्यावरी झारा / घेतलेल्या -९४४-
राजाने पुसीले / वाटे हा आचारी / आपुल्या चांगला / ओळखीचा -९४५-
इंद्रप्रस्थाचे जे / राजे युधिष्ठिर / तेथेच जमली / दोस्ती मस्त -९४६-
युधिष्ठिरांनी ना / राज्य गमावले / वाटते शोधितो / काम हाही -९४७-
याचे स्वैपाकास / चव अप्रतिम / मासला पहावा / हवे तर -९४८-
येणे रीती झाले / भीमासही काम / आचारी म्हणूनी / राजगृही -९४९-
राणी सुदेष्णाच्या / दासीने ओळख / करूनिया दिली / द्रौपदीची -९५०-
जुन्या वस्त्रातही / नव्हते लपत / देखणे लावण्य / द्रौपदीचे -९५१-
सुदेष्णा म्हणाली / तुजसम स्त्रीने / असावें सैरंध्री / भाग्य माझे -९५२-
द्रौपदी म्हणाली / आपलेही नांव / सुदेष्णा नव्हेच / उगाच तें -९५३-
आपणाचे साठी / साज करण्यांत / रमून जाईल / मन माझे -९५४-
इतरांसमोर / जाण्याचा कांहीच / प्रश्न न उरेल / येणें रीती -९५५-
गोशाळेत काम / तंत्रीपाल ऐसे / मिळाले सहजी / सहदेवा -९५६-
भल्या पहाटेस / ऐकूनी सुस्वर / गाणें शिकवावें / उत्तरेस -९५७-
अर्जुन जाहला / संगीतशिक्षक / बृहन्नडा ऐसे / नांव त्याचें -९५८-
नकुलास काम / अश्वशाळेमध्ये / घोड्यांची करावी / देखभाल -९५९-
अज्ञातवासाचे / दिवस ऐसेंनी / एकेक करीत / पालटत -९६०-

**(३३)**

सर्वांना माहीत / दुर्योधन कधी / समंजसतेनें / वागेल कां -९६१-
वाद विकोपास / गेल्यास माजेल / युद्धही शक्यता / तीच होती -९६२-
प्रत्येकाचे मनीं / म्हणूनी होतेच / आडाखे बांधणें / चाललेले -९६३-
श्रेष्ठ वीर होते / केवळ दोनच / कर्ण नि अर्जुन / सर्वमान्य -९६४-
कर्णाकडे होती / कवचकुंडलें / नव्हती सुरक्षा / अर्जुनास -९६५-
म्हणूनी नव्हते / दोघे तुल्यबळ / द्वंद्वामध्ये हवा / समतोल -९६६-
याचकास दान / देण्याचे बाबत / कर्ण दानशूर / ख्यातनाम -९६७-
इंद्राने योजिलें / याचक होऊनी / कवचकुंडलें / मागावीत -९६८-
कुणकुण याची / सूर्यास लागली / कर्णास सावध / स्वप्नी केले -९६९-
आभार मानूनी / सूर्यास उत्तर / कर्णाने दिधले / बाणेदार -९७०-
क्षुद्रता करूनी / जगेन जरी मी / शतायुषी तरी / तेंही खोटे -९७१-

कीर्तिवंत भव / एवढाच वर / देता झाला सूर्य / तेव्हां त्यास -९७२-
दुसरे दिवशी / अर्घ्य देऊनिया / दरबारी आला / कर्ण जेव्हां -९७३-
ब्राह्मणवेषांत / आलेल्या इंद्रास / कर्णाने पुसीले / काय हवें -९७४-
आणीक म्हटलें / देवेंद्र आपण / कां व्हावें भिक्षुक / माझे दारीं -९७५-
दानशूरतेची / तुझी कीर्ति व्हावी / अमर म्हणूनी / येणें झालें -९७६-
कवचकुंडलें / दान मागीतले / इंद्रानें निश्चय / राखूनीया -९७७-
कापून काढूनी / कर्णानेही दिली / कवचकुंडलें / औदार्यानें -९७८-
इंद्राने लगेच / हात फिरवूनी / जखमा क्षणांत / घालविल्या -९७९-
नितळ जाहली / जरी सारी काया / कुंतलांचें तेज / नव्हतेंच -९८०-

**(३४)**

सुदेष्णेचा भाऊ / कीचक होता ना / वीर सेनापती / विराटाचा -९८१-
वागणें परंतु / होते मनमानी / वचक तरीही / त्याचा होता -९८२-
राणीचे भेटीस / जातां नजरेस / पडली सैरंध्री / सहजचि -९८३-
राणीस म्हणाला / तुझी ही सैरंध्री / शोभेल अधिक / माझी पत्नी -९८४-
राणीने घातले / द्रौपदीचे कानी / कीचकाचे मनीं / काय आलें -९८५-
भीम नि अर्जुन / यांचेबरोबर / योजना ठरली / मग कांही -९८६-
काढला पाहिजे / कीचकाचा कांटा / जीवंत राहील्या / सतावेल -९८७-
कामार्त कीचक / येईल कोठेही / गडद अंधारीं / बोलवावें -९८८-
द्रौपदीनें जेव्हां / संकेत दिधला / कीचक मनांत / हरखला -९८९-
अवसेचे रात्री / तालिमीचे मागें / भेट पारावरी / ठरलेली -९९०-
कीचक जातांना / भिंतीजवळून / भीमानें गर्दन / मुर्गळली -९९१-
नकुलाने मग / टांगून दिधलें / कीचकाचे प्रेत / झाडावरी -९९२-
वदंता होतीच / रक्षण करण्या / सैरंध्रीचे कोणी / पांच यक्ष -९९३-

**(३५)**

अज्ञातवासाचा / अखेर होण्याची / जवळ आलेली / वेळ होती -९९४-
दुर्योधन होता / अधीर झालेला / पांडवांचा शोध / लागावा कीं -९९५-
विराट राजाचे / सेनानीस मृत्यू / देण्याचें सामर्थ्य / कोणीं केलें -९९६-
केवळ पांडव / करूं शकतात / दुर्योधना मनीं / खात्री वाटे -९९७-
परि पांडवांना / उघड उघड / समोर आणणें / हवें होतें -९९८-
पांडवांचे ब्रीद / मोडेलसे कांही / केल्यास बाहेर / येतील ना -९९९-
कीचक गेल्यानें / विराटाचे कांहीं / सामर्थ्य कमीसे / झाले आहे -१०००-
कुरापत त्याची / कांही काढल्यास / येतील पांडव / मदतीस -१००१-
त्रिगर्त राजास / निरोप मिळाला / गोधन हराया / नामी संधी -१००२-
प्रथम करूनी / हल्ला एकीकडे / विराटास तुम्ही / गुंतवावें -१००३-
वांटून घेऊं जें / गोधन मिळेल / सुशर्मास त्यांत / रस आला -१००४-

योजनेप्रमाणे / सुशर्माचे मागे / विराट गुंतला / एकीकडे -१००५-
गोधन घेऊनी / कौरव निघाले / त्यांना रोकण्यास / नाहीं कोणी -१००६-
राजकुमार तो / उत्तर बालक / हताश जाहला / दीनवाणा -१००७-
सैरंध्रीने तेव्हां / त्यास धीर दिला / सारथ्य जाणीते / बृहन्नडा -१००८-
सहदेवानेही / होते सांगीतले / अज्ञातवास हो / संपलासे -१००९-
बृहन्नडेनेही / रथ पेलल्याने / उत्तरास वीर्य / संचारले -१०१०-
परंतु दूरचे / कौरव पाहून / पुनश्च जाहला / हतबल -१०११-
तेव्हां अर्जुनाने / रथ वळवला / स्मशानाचेकडे / लगोलग -१०१२-
शमीवृक्षावरी / जाऊन त्वरेने / गांडीव घेऊनी / उतरला -१०१३-
लगाम देऊनी / उत्तराचे हातीं / म्हणे कौरवांचे / पाठी चल -१०१४-
दृष्टीचे टप्प्यात / येतांच कौरव / शंख देवदत्त / फुंकारला -१०१५-
आणि टणत्कार / गांडीवाचा केला / आव्हान तें केलें / कौरवांना -१०१६-
दुर्योधन म्हणे / जवळीं भीष्मांना / आव्हान हें कैसे / अर्जुनाचे -१०१७-
पुन्हां वनवास / अज्ञातवासही / आतां भोगतील / पांडव ना -१०१८-
भीष्मांनी म्हटलें / भ्रमात तूच गा / कालच संपले / भोग सारे -१०१९-
ठेवी सुजाणता / जावें परतुनी / गोधनाची आता / सोडी आशा -१०२०-
सुशर्मास हार / देऊनी विराट / चिंतेतच होते / परतले -१०२१-
परंतु गोधन / घेऊनी उत्तर / दाखल जाहला / रुबाबात -१०२२-
विराटास झाली / साऱ्या पांडवांची / नव्याने ओळख / हर्षमय -१०२३-

**(३६)**

धर्माने म्हटले / हस्तिनापुरास / संदेश पाहिजे / पाठवाया -१०२४-
विराटानी केली / दूताची व्यवस्था / संदेश पोंचला / कौरवांना -१०२५-
परत मिळावें / इंद्रप्रस्थ आम्हां / नाहीतरी पांच / गांवे फक्त -१०२६-
तेव्हां दुर्योधन / निश्चयें बोलला / जिंकूनियां घ्यावें / पांडवांनी -१०२७-
एरव्ही नाहीच / जमीन मिळेल / सुईचे टोकांशी / राहीलशी -१०२८-
जिंकूनियां घ्यावें / ऐसे म्हणण्यांत / उघड आव्हान / युद्धाचे तें -१०२९-
हट्टी दुर्योधन / ऐकेल कोणाचे / ऐसा कोणी नाही / दरबारीं -१०३०-
भीष्म द्रोण कृप / यांची कीं धारणा / केवळ तख्ताशी / बांधीलकी -१०३१-
धृतराष्ट्र नाही / समजावतील / हट्ट सोडण्यास / दुर्योधना -१०३२-
दूताने येऊनी / निवेदन केलें / राजदरबारीं / काय झालें -१०३३-

**(३७)**

दुर्योधन तरी / युद्धाची तयारी / करण्याचे कामीं / लागलाही -१०३४-
यादवांचे सैन्य / मिळावें म्हणूनी / कृष्णाचे भेटीस / दुर्योधन -१०३५-
परंतु श्रीकृष्ण / करूनियां सोंग / झोपेचे होते ना / पहुडले -१०३६-
मंचकाशेजारी / आसनावरती / उठण्याची वाट / पहातसा -१०३७-

बैसला असतां / अर्जुनही तिथें / आला तो बसला / पायांशीच -१०३८-
जाग आली ऐसे / करीत श्रीकृष्ण / पाहती समोर / अर्जुनास -१०३९-
श्रीकृष्ण पुसती / कांही काम होते / अस्थिर वाटले / दुर्योधना -१०४०-
मीच आधी आलों / प्रथम मजला / पुसणें नव्हे कां / शिष्टाचार -१०४१-
ओहो तूंही इथें / मला ना कळलें / दृष्टीस समोर / हाचि आला -१०४२-
तुम्हां भावंडांच्या / भांडणांत मला / पडायाचे नाहीं / हें तों खरें -१०४३-
विकोपास जरी / भांडण जाईल / युद्धही जुंपेल / कोणां ठावें -१०४४-
परि हातीं शस्त्र / मुळी ना धरेन / आधीच करीतो / स्पष्ट पहा -१०४५-
पंच महाभूतें / जयास मानीती / तयास शस्त्रांची / जरूर कां -१०४६-
सूर्याचे तेजाने / पर्जन्य वृष्टीने / वादळ उठोनी / भूकंपाने -१०४७-
ऐसे कितीकही / उपाय वशात / असतां हवीत / शस्त्रें काय -१०४८-
असो हें केवळ / सूज्ञ जाणतात / प्रसंग समोर / प्रापंचिक -१०४९-
श्रीकृष्ण बोलले / अर्जुना प्रथम / तुजसी पाहिले / तूंच सांग -१०५०-
दशसहस्रसे / यादव सैन्य नि / निःशस्त्र श्रीकृष्ण / यांच्यापैकी -१०५१-
एकाची निवड / करायाची झाली / तरी तुझी कैसी / निवड गा -१०५२-
अर्जुन म्हणाला / मजसी सर्वस्वी / कसाही कोठेंही / तूंच हवा -१०५३-
दुर्योधन करी / लगेचच पृच्छा / तरी मग सैन्य / मजसी ना -१०५४-
प्रश्न जरी होता / जर-तर-चाच / निर्णया आतुर / दुर्योधन -१०५५-
हंसले श्रीकृष्ण / विजयी मुद्रेने / निघोनीया गेला / दुर्योधन -१०५६-
मुंग्या कीं असंख्य / जमल्या तरीही / येईल हत्तीची / शक्ती काय -१०५७-
अर्जुनाने तेव्हां / केली विनवणी / करावें सारथ्य / माझे रणीं -१०५८-

**(३८)**

युधिष्ठिर म्हणे / समज नकोच / आम्हांही युद्धाची / खुमखुमी -१०५९-
शिष्टाई करण्या / कृष्णास विनंती / केली पांडवांनी / मान्य झाले -१०६०-
ऐकूनी प्रस्ताव / धृतराष्ट्र म्हणे / कांहीही निर्णय / देईन मी -१०६१-
हट्टी दुर्योधन / जरी न मानेल / कधीही नाराजी / उफाळेल -१०६२-
दुर्योधनासही / कृष्णांनी म्हटले / करी गा विचार / शांतपणे -१०६३-
फक्त इंद्रप्रस्थ / देई पांडवांना / पावशील सुख / ध्यानी घेई -१०६४-
पांडवांनी तरी / फक्त पांच गांवें / मागीतली तेंही / अमान्य कां -१०६५-
पांडवांना जरी / कांही नाही दिले / होईल तें कैसे / सुखावह -१०६६-
संपूर्ण राज्याची / तुझी अभिलाषा / कधीच नसेल / सुखावह -१०६७-
दुर्योधन म्हणे / एकदा ठरले / निश्चयी रहावे / क्षात्रधर्म -१०६८-
मोडेन तरीही / नाही वांकणार / पांडवांना सांग / भेटूं रणीं -१०६९-
धृतराष्ट्रालागी / श्रीकृष्ण म्हणाले / राजाचे कर्तव्य / निर्णयाचे -१०७०-
निर्णय घेण्यास / लागतो निग्रह / त्याचाच अभाव / तुम्हांठायीं -१०७१-

श्रीकृष्णाचे संगें / सात्यकी आलेला / त्यास लागलेली / कुणकुण -१०७२-
कृष्णास अटक / करण्याचा घाट / दुर्योधनाने कीं / रचलेला -१०७३-
सात्यकीनें केलें / राजांना सूचित / दूताशी नव्हे हा / व्यवहार -१०७४-
श्रीकृष्ण म्हणाले / राजांना तसदी / देण्यायोग्य नाहीं / बाब कांही -१०७५-
इतुक्यांत आला / सैनिक घेऊनी / दुर्योधन म्हणे / ताब्यांत घ्या -१०७६-
ऐशी त्याची आज्ञा / पूरी होण्याआधी / कृष्णांनी अंगुली / फिरवली -१०७७-
साऱ्या सैनिकांना / दुर्योधनासही / फेर धरूनीया / नाचवीत -१०७८-
ठेऊनी निघाले / सभेत हंशाच / पिकला खजील / दुर्योधन -१०७९-

**(३९)**

वाटेत महाल / कर्णाचा लागला / त्यास भेटावया / कृष्ण गेले -१०८०-
कर्णास म्हणाले / अन्यायाची साथ / देणाराही होतो / अन्यायीच -१०८१-
तुझीया जन्माचे / रहस्यही तुज / सांगावया हवें / ध्यान देई -१०८२-
दुर्वासांच्या मंत्रे / सूर्याच्या प्रसादें / कुंतीचा तूं तरी / ज्येष्ठ पुत्र -१०८३-
पांडवांना जरी / सांगेन रहस्य / कर्णानेच वाक्य / पूर्ण केलें -१०८४-
धर्म देईलही / मज इंद्रप्रस्थ / दुर्योधनासच / देईन मी -१०८५-
आजन्म ऋणी मी / त्याचा झालों आहे / तैसेच करेन / जाण कृष्णा -१०८६-
तैसे करण्याचे / आधी कीं फुलेल / पांडवांचे तुझे / सख्य खरें -१०८७-
नाही तें कदापि / होणें नाही योग्य / तेव्हां तें जें झालें / प्रदर्शन -१०८८-
दोघा क्षत्रियांची / द्वंद्वानंतरच / ईर्षा ती संपावी / तेंच योग्य -१०८९-
नियतीस ठावें / दोघांपैकी कोण / जगेल ती तमा / मज नाही -१०९०-
पौरुषाविना कां / कोणास लाधलें / अमरपद वा / कीर्ती कांही -१०९१-
तरी मग कर्णा / आपुला संवाद / दोघांमधीलच / रहस्य तें -१०९२-

**(४०)**

व्यास जेव्हां आले / किंकर्तव्यमूढसे / चिंतामग्न होते / धृतराष्ट्र -१०९३-
सामान्य लोकही / दुराग्रही पुत्र / कैसे संभाळती / काय म्हणूं -१०९४-
व्यासांनी म्हटलें / याचा परिणाम / कसा होतो पहा / स्वतःच तूं -१०९५-
प्रत्यक्ष वृत्तांत / तुजला मिळावा / म्हणूनी योजना / आहे मनीं -१०९६-
संजयास तेव्हां / दिव्यदृष्टी आणि / अदृश्य वलय / संरक्षक -१०९७-
देऊनी व्यासांनी / सांगीतले त्याला / पाहशील दृश्य / अदृश्यही -१०९८-
रणधुमाळीच्या / अखेरपर्यंत / राहील तुझी ही / दिव्यदृष्टी -१०९९-
रणांगणातही / निर्वेध संचार / करूनी वृत्तांत / देई ह्यांना -११००-

**(४१)**

युद्धाची तयारी / करण्याचे कामीं / दुर्योधन आला / भीष्मांकडे -११०१-
भीष्मांनी म्हटले / योद्धा नि खाटीक / वाटतात मज / समशील -११०२-
असंख्य जीवांना / जीवें मारण्याचे / निर्दयपणानें / करतात -११०३-

दुर्योधन म्हणे / योद्ध्यास लागते / तयारी स्वतःचे / मरणाची -११०४-
निग्रहात ठाम / असण्याबाबत / आपुली ती ख्याती / त्रिलोकांत -११०५-
म्हणून विनंती / सेनाधिपतीची / धुरा आपणच / स्वीकारावी -११०६-
कर्तव्याशी बद्ध / असल्याकारणें / अशक्य प्रस्ताव / नाकारणे -११०७-
परि एक आहे / मर्यादा मजसी / तीही घेई नीट / समजूनी -११०८-
कुणा स्त्रीसमान / व्यक्तीशी अथवा / स्त्रीत्वाने जन्मल्या / व्यक्तीपुढे -११०९-
सामना करणें / मज आहे वर्ज्य / ब्रह्मचर्याचे ना / ब्रीद माझे -१११०-
म्हणून शिखंडी / आल्यास समोर / हल्ला तो निमूट / साहेन मी -११११-

**(४२)**

दिसतो गूढसा / कांही इतिहास / शिखंडी स्त्रीलिंगी / जन्मला कां -१११२-
होत्या मी आणिल्या / काशीच्या राजाच्या / तीन्ही राजकन्या / पळवून -१११३-
त्यापैकी अंबेने / आधीच मनानें / शल्यास वरलें / सांगीतले -१११४-
शल्याकडे जरी / तिजला धाडीले / शल्याने तिजला / अव्हेरले -१११५-
वनात निघून / गेली ती पोंचली / अकृतव्रणांच्या / आश्रमांत -१११६-
ऋषींनी धनुष्य / देऊनी म्हटले / बांबूचा बनव / बाण बाले -१११७-
तयार होईल / बाण तेव्हां तुज / समजेल काय / करायचे -१११८-
बाण जसा झाला / तयार त्यावेळी / दाखल जाहले / उमापती -१११९-
रेशमाचा धागा / त्यांनी तिला दिला / म्हटले बाणास / बांध खूण -११२०-
मग आकाशात / बाण दे सोडून / पुन्हा कधीतरी / दिसेल हा -११२१-
स्मृती तेव्हां साऱ्या / तुझ्या जागतील / सांगून जाहले / अंतर्धान -११२२-
परि जेव्हां तिने / बाण तो सोडीला / जाहली तेथेच / गतप्राण -११२३-
द्रुपदाने केला / यज्ञ नि अग्नीने / द्रौपदी तयास / देण्याआधी -११२४-
तपश्चर्या त्याने / शंभूची करूनी / पुत्रप्राप्ति-वर / मागीतला -११२५-
शंभूंनी म्हटले / राणीचे गर्भात / वाढतोच आहे / तुझा पुत्र -११२६-
शिखंडी जन्मली / तरी द्रुपदाने / पुत्रच जन्मला / सांगीतले -११२७-
पुत्राप्रमाणेंच / वाढवून वरी / विवाहही केला / शिखंडीचा -११२८-
दर्षन राजाची / राजकन्या झाली / शिखंडीची पत्नी / विवाहाने -११२९-
शिखंडी पुरुष / नाही ती माहिती / तिने वडिलांना / कळवली -११३०-
फसवणुकीचा / मानूनियां रोष / हिरण्यवर्मन्ने / हल्ला केला -११३१-
आपुल्यामुळेच / आला हा प्रसंग / मानूनी शिखंडी / वनीं गेला -११३२-
तिथे यक्ष स्थून / भेटला तयास / वर मागीतला / शिखंडीने -११३३-
पुरुष होऊं दे / स्थूनाने म्हटले / होशील पुरुष / कांही काळ -११३४-
द्रुपदावरील / संकट टळतां / परताया हवें / पुरुषत्व -११३५-
परत जातांना / हिरण्यवर्मन्-च्या / सैनिकांचे हातीं / सांपडला -११३६-
राजाज्ञा जाहली / याला तपासावें / पुरुष आहे कीं / स्त्रीलिंगीच -११३७-

आतां तरी होता / पुरुष शिखंडी / कन्येचा आरोप / खोटा झाला -११३८-
द्रुपदास त्याने / माफीचा मैत्रीचा / संदेश धाडीला / लगोलग -११३९-
ठरल्याप्रमाणे / स्थूलास भेटण्या / शिखंडी पुनश्च / वनीं गेला -११४०-
स्थूनाने म्हटलें / पुरुषत्व तुझे / परतून घेणें / नाहीं शक्य -११४१-
लिंगबदलाचे / माझे तें वर्तन / नाही मान्य झालें / कुबेरांना -११४२-
स्त्रीच मी रहावें / ऐसा आहे शाप / लिंगें बदलली / कायमची -११४३-
कांपिल्यनगरीं / परत जातांना / वेशीकडे दृष्टी / शिखंडीची -११४४-
पडली अन् तिथे / खुणेचा तो बाण / होता अडकला / सांध्यामधे -११४५-
पाहून जाहला / शिखंडीस सारा / इतिहास मनीं / उजागर -११४६-
राजकन्या कोणी / पळविल्या आणि / शल्यानें अंबा कां / अव्हेरली -११४७-
म्हणून मर्यादा / आहेत मजला / माझ्याच कर्माचे / फलित कीं -११४८-

**(४३)**

कुरुक्षेत्रावरी / झडल्या युद्धाचा / संजय वृत्तांत / सांगताहे -११४९-
कौरव पक्षाचे / अकरा अक्षौहिणी / प्रथम दाखल / झाले सैन्य -११५०-
पांडवांचे होते / सात अक्षौहिणी / सेनानीची धुरा / भीमाकडे -११५१-
शस्त्रास्त्रे पेलुनी / सारे महारथी / सज्ज असतांना / युधिष्ठिर -११५२-
शस्त्रें ठेऊनियां / आपुली रथात / पायीच निघाला / निश्चयाने -११५३-
थक्क होउनीया / सारे पाहतांना / भीष्मांचे समोर / पोहोचला -११५४-
वंदन करूनी / म्हणाला विनम्र / आपणासंमुख / लढण्याची -११५५-
अनुज्ञा असावी / आशिष ही द्यावा / आम्हां पांडवांना / पितामह -११५६-
आदर्शमय हें / तुझें हें वागणे / जिंकून घेते रे / युधिष्ठिरा -११५७-
"विजयी भव" सा / आशीर्वाद परि / आज तुज देणें / शक्य नाही -११५८-
चल हिंमतीने / खेळूं या हें युद्ध / भावना बाजूस / सारोनीया -११५९-
द्रोण आणि कृप / यांचीही अनुज्ञा / घेऊनी बोलला / आवाहन -११६०-
आतां या क्षणीही / आमचे बाजूस / यावयाचे आहे / जरी कोणा -११६१-
पूर्ण सौहार्दानें / घेऊं सामावून / म्हणतां युयुत्सू / पाठीं आला -११६२-
दुर्योधनाच्या त्या / सावत्र बंधूस / स्वतंत्र वाटलें / खूप तेव्हां -११६३-
दुर्योधन गेला / द्रोणांचे जवळ / आढावा घेतसा / थोडक्यात -११६४-
पांडव सैन्याच्या / व्यूहाची रचना / धृष्टद्युम्नाने कीं / पहा केली -११६५-
आपल्या बाजूचे / पहावें कीं सैन्य / अफाट आहे ना / जमलेलें -११६६-
परि त्यांचेकडे / नामांकित वीर / द्रुपद विराट / पांडवही -११६७-
कोणाचे पारडें / जड आहे म्हणूं / लक्ष आचार्यांचे / होतें काय -११६८-
शेजारी भीष्मांनी / उत्साहें गर्जुनी / फुंकीला त्वेषानें / सिंहनाद -११६९-
उत्तरसे देत / कृष्णांनी फुंकीला / पांचजन्य आणि / अर्जुनाने -११७०-
देवदत्त शंख / धर्माने फुंकीला / अनंतविजय / भीम पौंड्र -११७१-

कितीक शंखांच्या / ध्वनींच्याच लाटा / आदळल्या कौरव / सैन्यावर -११७२-

**(४४)**

तुंबळ ऐसेंनी / माजले असतां / कृष्णास अर्जुन / म्हणे रथ -११७३-
न्यावा मधोमध / दोन्हीही सैन्यांचे / युद्धाचा अंदाज / घेण्यासाठीं -११७४-
ज्येष्ठ श्रेष्ठ आप्त / स्वकीय पाहून / संभ्रम जाहला / अर्जुनास -११७५-
ज्यांचेसाठी घाट / राज्याचा करावा / तेच समर्पित / ठाकले कीं -११७६-
याच सर्वांना कां / मारायचे तर / राज्य भोगायाचे / कोणासाठी -११७७-
महापापाचेच / धनी होण्यासाठी / वाटतें सजले / युद्ध हें कां -११७८-
ऐसे अचानक / विचार आल्याने / हातांत गांडीव / पेलवेना -११७९-
अर्जुन संमोही / पाहूनी श्रीकृष्ण / म्हणती हें काय / भलतेंच -११८०-
कैसे हें किल्बिष / अनार्य अयोग्य / अस्वर्ग्य मांडले / अशोभनीय -११८१-
अर्जुन म्हणतो / सामोरी पहा ना / प्रिय वंदनीय / भीष्म द्रोण -११८२-
युद्ध म्हणूनी कां / यांनाही मारावें / भिक्षासेवनीही / स्मरावेसे -११८३-
कृष्णांनी ते वेळीं / निवेदिलें सार / भक्तीचे ज्ञानाचे / कर्माचेही -११८४-
कोण कोणा नाही / मारीतो अर्जुना / आत्मा तो अमर / सर्वकाळ -११८५-
माझें सत्यरूप / जरी विश्वंभर / लोकक्षयासाठी / ठाकलो मी -११८६-
भीष्म द्रोण सारे / आधीच मारीले / आहेत निमित्त / तुवां व्हावें -११८७-
मम ठायीं रत / सदा ठेवी मन / सारी तुझी पापें / हरेन मी -११८८-
सारा तो संवाद / ऐकण्याचे भाग्य / संजयास सुद्धा / लाभले कीं -११८९-
धृतराष्ट्रांनाही / निवेदन केला / निर्वाळाही दिला / स्वतःचाच -११९०-
जेथें जेथें कृष्ण / अर्जुन आहेत / तेथेंच विजय / निश्चित कीं -११९१-
अमृतोपदेश / मनीं सांठवून / अर्जुन जाहला / पुन्हां सज्ज -११९२-

**(४५)**

खणखणाट सुरूं / झाल्याबरोबर / भीष्मांच्या रथाने / वेग दिशा -११९३-
ऐशा कीं साधल्या / साऱ्या रणांगणीं / एकच फिरते / वावटळ -११९४-
कैसा काय व्यूह / कैसे काय डाव / सारेच उध्वस्त / केले त्यांनी -११९५-
ऐसे सात दिन / पांडवांचे सैन्य / भीष्मांनी केलें कीं / हतबल -११९६-
आठवे दिवशी / कृष्णांनी पेलला / रथ भीष्मांकडे / निश्चयाने -११९७-
विराटाने तेव्हां / आडोसा दिधला / पण तोच त्यांत / कामी आला -११९८-
जुंपल्या युद्धाच्या / धुमश्चक्रीमध्ये / वाचला अर्जुन / कसाबसा -११९९-
नववे दिवशी / पुनश्च कृष्णांनी / भीष्मांचा सामना / योजीयेला -१२००-
परंतु भीष्मांनी / दिवस अखेरी / रथाचे चाकच / मोडीयेलें -१२०१-
कृष्णांनी तत्परे / चाक उगारतां / भीष्मांनी पुसीले / हें बा काय -१२०२-
शस्त्र हाती नाही / धरणार ऐसा / पण केलेला ना / युद्धारंभी -१२०३-
कृष्णांनी म्हटलें / शस्त्र नव्हे चक्र / रक्षणाचे साठी / उचलले -१२०४-

भीष्मांनी म्हटलें / असो तें कांहीही / कांही क्षात्रतेज / पाहिले ना -१२०५-
तेवढ्या दर्शने / आहे समाधान / चला सांज झाली / नमस्कार -१२०६-
भीष्मांना पडलें / स्वप्न रात्री कांही / श्रीकृष्ण भेटीस / स्वतः आले -१२०७-
श्रीकृष्ण म्हणाले / ऐशा पराक्रमें / अन्याय पोसणें / सार्थक कां -१२०८-
वेळ नाही काय / अजूनही आली / विश्रांती घेण्याची / रणातून -१२०९-
भीष्म उत्तरले / थकलो जरी मी / रणी उतरता / संचारते -१२१०-
कृष्णांनी पुसीले / त्याच्यावर कांहीं / उपाय नाहीं कां / हमखास -१२११-
आहे ना उपाय / शिखंडी जर कां / होईल दाखल / माझ्यापुढें -१२१२-
स्वप्नामधील त्या / संवादलहरी / कृष्णाचे कानी कां / पोहोचल्या -१२१३-
दुसरे दिवशी / कृष्णांनी इशारा / केला शिखंडीस / रथ तुझा -१२१४-
माझे रथासह / आण चालवीत / आहे ना ध्यानात / लाल फीत -१२१५-
शिखंडी समोर / येतांना पाहून / भीष्मांनी त्यागीली / शस्त्रें सारी -१२१६-
अर्जुनास केला / कृष्णांनी इशारा / भीष्मांना विश्रांती / देणें आहे -१२१७-
शिखंडी अर्जुन / दोघांनी मिळून / बाण वर्षूनीया / विद्‌ध केलें -१२१८-
अति जर्जरसा / झालेला तो देह / भीष्मांनी झोकून / दिला परि -१२१९-
बाणांनी ठेवीले / अधांतरी त्यास / पडूं नाही दिला / भूमीवर -१२२०-
भीष्म पडल्याने / युद्‌ध थांबले नि / सारे सभोंवती / गोळा झाले -१२२१-
भीष्मांनी म्हटलें / पडलों जरी मी / जिवंत राहीन / कांही काळ -१२२२-
उत्तरायणाचा / प्रारंभ होईतों / चालूच राहील / श्वासोच्छ्‌-वास -१२२३-
डोक्याखाली जरा / आधार करावा / म्हणतां सैनिक / पुढे आले -१२२४-
परंतु भीष्मांनी / म्हटले योग्यसा / आधार देईल / अर्जुनचि -१२२५-
तीन बाण त्यानें / ऐसे मारियेले / बाणांच्या पिसांनी / उसे केलें -१२२६-
भीष्मांनी पाणीही / मागितले तेव्हां / आणि एक बाण / मारोनियां -१२२७-
ऐसा उसळला / फँवारा नेमकी / धार आली ओठीं / शीतलसी -१२२८-
निघा सारे असा / इशारा झाल्याने / तंबूंकडे गेले / आपापल्या -१२२९-

**(४६)**

आता द्रोणाचार्य / जाहले सेनानी / रचावे ठरलें / चक्रव्यूह -१२३०-
त्रिगर्तांचा राजा / सुशर्मन् यानें / अर्जुनास दूर / गुंतवावें -१२३१-
सुगावा लागला / साऱ्या योजनेचा / धृष्टद्‌युम्न म्हणे / अर्जुनास -१२३२-
चिंता नको करुं / प्राणपणानें मी / धर्मराजालागी / सांभाळेन -१२३३-
चक्रव्यूह परि / साऱ्याच पांडव / सैन्यास घेरतो / ऐसे झाले -१२३४-
तेव्हां अभिमन्यू / म्हणाला आईचे / उदरी असतां / ऐकले मी -१२३५-
चक्रव्यूहभेद / कसा करायचा / स्वतः श्रीकृष्णांनी / सांगतांना -१२३६-
परि मी हुंकार / दिल्याने जाहला / खंडित संवाद / अनमोल -१२३७-
चक्रव्यूहातून / परतावे कैसे / राहीले घेण्याचे / समजुनी -१२३८-

नको चिंता परि / माझे पाठोपाठ / राहाल तोडगा / निघेलहि -१२३९-
अभिमन्यूने जी / मारली मुसंडी / भेदला निश्चित / व्यूह त्याने -१२४०-
त्याचेपाठी कोणी / शिरू न शकले / जयद्रथाने कीं / थोपविलें -१२४१-
अभिमन्यूचा कीं / रथ लुडकला / तेव्हां त्यानें चाक / उचलोनी -१२४२-
कितीकांचे उरी / नाचत आणिक / स्वतःचा बचाव / करीतही -१२४३-
शल्य नि शकुनी / यांनी मिळूनिया / पाडिला शेवटी / अभिमन्यू -१२४४-
युद्धाचे सारेच / संकेत मोडूनी / जल्लोषही केला / विजयाचा -१२४५-

**(४७)**

त्रिगर्त राजास / देऊनिया हार / अर्जुन इकडे / परतला -१२४६-
तेव्हां समजले / जयद्रथानेच / अभिमन्यूवर / वार केला -१२४७-
त्याचाच निःपात / करावया हवा / म्हणून उद्घोष / त्याने केला -१२४८-
सूर्यास्ताचे आधी / जयद्रथवध / अथवा अग्नीस / समर्पण -१२४९-
चिताही रचली / परि लक्ष्य होते / जयद्रथवध / साधण्याचे -१२५०-
कृष्णांनी सावध / तेव्हां त्यास केलें / कांहीं इतिहास / सांगोनियां -१२५१-
पिता वृध्दक्षात्र / यांना ज्ञात होते / युद्धात मरण / जयद्रथा -१२५२-
तेव्हां त्यांनी शाप / ऐसा उच्चारला / पुत्राचे मुंडके / भूमीवरी -१२५३-
पडतांच त्याचा / विस्फोट होईल / आश्रमीं आहेत / जवळीच -१२५४-
द्रोणांनी स्वतःच / केल्याने आडोसा / होता जयद्रथ / सुरक्षित -१२५५-
श्रीकृष्णांनी तेव्हां / सूर्याचा प्रकाश / रोखला वाटली / संध्याकाळ -१२५६-
युद्ध तें थांबले / अर्जुन करेल / आत्मसमर्पण / पहावया -१२५७-
सारे गोळा झाले / जयद्रथ सुद्धा / आला निर्धास्तसा / समोरच -१२५८-
कृष्णांनी लगेच / सूर्याचा प्रकाश / पुनश्च सतेज / खुलवीला -१२५९-
पाते लवण्याचे / आधी अर्जुनाने / जयद्रथशीर / उडवलें -१२६०-
पित्याचे ओंजळीं / जाऊन पडलें / चकित जाहले / वृध्दक्षात्र -१२६१-
त्यांचेच हातून / शीर निसटले / विस्फोटी खपले / वृद्धक्षात्र -१२६२-

**(४८)**

द्रोणांची योजना / युधिष्ठिरासच / घेरूनी करावें / जेरबंद -१२६३-
परि त्यांचेवर / चाल करूनियां / द्रुपद मागून / येत होता -१२६४-
मागील बाजूस / भाला फेकूनिया / द्रुपद पाडिला / जरी त्यांनी -१२६५-
धृष्टद्युम्न आला / समोरून त्याने / वार चढवीला / छातीवर -१२६६-
त्याचा प्रतिकार / करू पाहतांना / भीमाची आरोळी / कानी आली -१२६७-
खल्लास खल्लास / अश्वत्थामा झाला / भ्रमित जाहले / द्रोणाचार्य -१२६८-
द्रोणांनी केलेल्या / प्रश्नास धर्माने / नरो वा कुंजरो वा / म्हटलेले -१२६९-
साऱ्या गोंधळात / धृष्टद्युम्नाने ना / आचार्यांना दिली / वीरगति -१२७०-
उद्विग्न होऊनी / अश्वत्थामा आला / दुर्योधनाकडे / आणि म्हणे -१२७१-

केवळ मलाच / आचार्यानी दिला / मंत्र विशेषशा / अस्त्राचा कीं -१२७२-
परंतु तयाचा / केवळ एकदा / प्रयोग असतो / करायचा -१२७३-
पांडवांपासून / वांचवाया पृथ्वी / वाटते आताहे / वेळ आली -१२७४-
अंतर्ज्ञानाने तें / कृष्णांनी जाणीले / सावध पांडव / सैन्य केलें -१२७५-
नारायणीयशा / अस्त्राचा प्रयोग / अश्वत्थात्म्याने हो / योजीयेला -१२७६-
शस्त्रास्त्रे टाकूनी / सर्वांनी राहावें / पडूनी निश्चेष्ट / भूमीवरी -१२७७-
हवेतच गेले / अस्त्र तें विरून / निघोनीया गेला / अश्वत्थामा -१२७८-

**(४९)**

कर्ण दुर्योधन / यांच्यात जाहली / कौरव पक्षात / खलबतें -१२७९-
कर्णाने म्हटले / माझे क्षत्रियत्व / सदाचेच आहे / तुझे ऋणी -१२८०-
कर्णाने पेलावी / सेनानीची धुरा / निर्णय जाहला / सहजचि -१२८१-
अर्जुना सारथ्य / कृष्णाचे म्हणूनी / शल्यांना कर्णाने / विनविलें -१२८२-
युद्धातील स्थिती / राजवाड्यामध्ये / सर्वांना विदित / होत होती -१२८३-
कुंतीचे मनांत / झाली घालमेल / कर्णाचे महालीं / थेट आली -१२८४-
कुंतीने कांहीही / बोलण्याआधीच / कर्णाने चरण / वंदियेलें -१२८५-
ऐसा योग कधी / आला नाही माते / चरणवंदन / करण्याचा -१२८६-
कृष्णांनी मजला / आहे सांगीतले / मी ना सूर्यपुत्र / कुंतीपुत्र -१२८७-
अर्जुन आणि मी / यांच्यापैकी कोण / राहील मजला / ठावें नाहीं -१२८८-
तुझे पुत्र पांच / परि राहतील / एवढे वचन / माझे जाण -१२८९-
तुम्ही सारे मला / सारखेच प्रिय / म्हणून मी आलें / भेटावया -१२९०-
ऐसा कांही मार्ग / तूंच काढशील / हीच मनीं आस / धरूनिया -१२९१-
ते तरी अशक्य / नाहीच शोभेल / अर्जुनास किंवा / मजलाही -१२९२-
एकांतात भेट / आपली जाहली / याचेच अप्रूप / दोघे मानूं -१२९३-

**(५०)**

कर्ण गेला मग / रणीं जेथे भीष्म / शरशय्येवरी / पहुडले -१२९४-
वंदन करूनी / म्हणाला तुम्हांसी / एकांती भेटणें / झाले नाहीं -१२९५-
आपुले प्रेमही / नाहीच लाभले / साऱ्या राजपुत्रां / जैसे झालें -१२९६-
युद्धापासूनही / आपण मजला / आजवरी दूर / ठेवियेलें -१२९७-
नाही रे बालका / भीष्माचे न्यायास / ऐसा पक्षपाती / म्हणूं नको -१२९८-
युद्ध हें मजला / नव्हतेंच मान्य / तरी शरशय्या / मज झाली -१२९९-
आणिक तूं आणि / अर्जुन ऐसा ही / सामना मजला / नको होता -१३००-
तुम्ही दोघे मला / सारखेच प्रिय / कुंतीही जाणते / कारण तें -१३०१-
परि उदईक / मज आहे द्वंद्व / अर्जुनासवेंच / करायाचें -१३०२-
सारखेच प्रेम / तुम्ही दोघांवर / केलें तें जाणूनी / सुखावलो -१३०३-
अनुदार माझे / वर्तन जाहलें / आजवर त्याची / क्षमा व्हावी -१३०४-

युद्धामधे आतां / सहभागी होण्या / अनुज्ञा असावी / प्रार्थितो मी -१३०५-
भीष्मांनी तथास्तु / म्हणतां तेथून / कर्ण महालात / परतला -१३०६-
(५१)
कर्ण निघोनीया / गेल्यावर भीष्म / ध्यानमग्न कांहीं / असतांना -१३०७-
श्रीकृष्णांनी त्यांचे / सारे मोहपाश / अनाहुतपणें / निवारिले -१३०८-
(५२)
कर्ण नि अर्जुन / समोरासमोर / ठाकले परंतु / स्थिती ऐसी -१३०९-
इंद्रधनुष्याने / मेघाच्छादनाने / अर्जुन तो कोठें / समजेना -१३१०-
संतप्त सूर्याच्या / प्रकाशाचा मात्र / कर्ण कोठलासा / अंश होता -१३११-
होत्या परस्परां / संवेदना मात्र / संवेदनांचेच / युद्ध कांई -१३१२-
दोघांच्या बाणांच्या / वृष्टीने साधली / अद्भुतशी लय / तांडवाची -१३१३-
बाण बाणासच / भिडत राहीले / पलीकडे नाही / जात बाण -१३१४-
अचानक परि / कर्णाच्या रथाचे / चाक कीं रुतलें / जमीनींत -१३१५-
कर्णाने दिधली / अर्जुनास हांक / थांब रे अर्जुना / क्षणभर -१३१६-
पायउतारा मी / होताहे निहत्था / रुतलेले चाक / ढकलाया -१३१७-
द्रौपदी सभेत / होती असहाय्य / थांबविला काय / अन्याय तूं -१३१८-
मानेस देऊनी / झटका कर्णाने / नैकर्तक भाला / फेकीयेला -१३१९-
अर्जुनास शिरीं / लागायचा परि / मुकुटास गेला / चाटुनीया -१३२०-
पाशुपत अस्त्र / होते जवळीच / परंतु मंत्रच / आठवेना -१३२१-
गाण्डीवामधून / निघालेला बाण / रुतला कर्णाचे / छातीमधे -१३२२-
शेवटचा श्वास / सोडतांना त्यानें / समोर कृष्णास / वंदियेलें -१३२३-
वरद हस्तानें / कृष्णांनी त्यावेळी / कर्णास दिधली / मनःशांति -१३२४-
(५३)
कौरव पक्षाचा / सेनानी होण्यास / शल्यांना जाहले / आमंत्रण -१३२५-
कृष्णांनी धर्मास / म्हटले सामना / करावा ज्येष्ठाचा / ज्येष्ठानेच -१३२६-
शांत स्थिर आणि / मृदुस्वभावीसा / विख्यात तरी कीं / युधिष्ठिर -१३२७-
त्यामुळे सर्वांचे / मनीं झाली चिंता / वाउगे कांहीं बा / होऊं नये -१३२८-
परि त्या दिवशी / ऐशा आवेशाने / चालूनिया गेला / धर्मराज -१३२९-
अवाक होऊन / पाहात राहिले / शल्य कोसळले / धुरळ्यात -१३३०-
शकुनीचा होता / बेत शिरण्याचा / पांडव सैन्याचे / पिछाडीने -१३३१-
नकुल आणिक / सहदेव दोघे / होते ना सतर्क / सदाचेच -१३३२-
दोघांनी मिळून / केलेल्या वाराने / तुकडे पडले / शकुनीचे -१३३३-
(५४)
कौरव पक्षाचा / पुढाकार आतां / स्वतःचे कडेच / घ्याया हवा -१३३४-
दुर्योधनाचे हें / ध्यानीं आल्यावर / आशीर्वादासाठी / लगेचच -१३३५-

हस्तिनापुरास / येऊनी भेटला / धृतराष्ट्र आणि / गांधारीला -१३३६-
मातेने म्हटले / बरें झाले आला / पहाटेस पुन्हां / येई नग्न -१३३७-
अजून सर्वत्र / अंधारच होता / गेला नदीवर / स्नानासाठी -१३३८-
कातर वेळेस / कोणीच नव्हते / नग्नच निघाला / मातेकडे -१३३९-
कृष्णानी तरीही / साद त्यास दिली / ऐसा कैसा कोठे / निघालास -१३४०
सांगावे लागले / निरागसपणे / मातेने दिलेला / आदेश कीं -१३४१-
वाड्याचे द्वारात / पहारेकरी ते / काय म्हणतील / विचारी गा -१३४२-
शिवाय कुक्कुले / बाळ तूं नव्हेस / पान तरी बांध / केळीचे हें -१३४३-
कृष्ण तिथे कसा / केळीचे पानही / हाती कैसे सारे / समजण्या -१३४४-
वेळ ती नव्हती / उलट कृष्णाचे / आभार मानूनी / पुढे गेला -१३४५-
दुर्योधन आला / चाहूल लागता / मातेने म्हटले / समोर ये -१३४६-
इतुकी वर्षे ना / डोळां बांधलेली / पट्टी खोलूनिया / गांधारीने -१३४७-
दुर्योधनाच्या त्या / सर्वांगावरती / दृष्टीच कां फक्त / फिरवली -१३४८-
तेजाचे झोतच / जेथे कां पडले / वज्रासम केलें / तें तें अंग -१३४९-
स्वतः गांधारीस / कांही ना दिसले / तिचा ज्येष्ठ पुत्र / आहे कैसा -१३५०-
पुन्हा डोळ्यांवरी / पट्टी बांधूनिया / म्हणाली आयुष्मान / भव बाळा -१३५१-
उशीराने आलें / दुर्योधना ध्यानी / वज्रलेप नाही / मांड्यावरी -१३५२-

(५५)

भीम दुर्योधन / दोघांच्याही गदा / लागल्या रणांत / भिरभीरू -१३५३-
कोण कुणीकडे / सरकतो आहे / कोणास कांहीच / समजेना -१३५४-
भीमाच्या गदेच्या / प्रहाराने तरी / हायच खाऊनी / किती सैन्य -१३५५-
गारद जाहले / कौरवांचे किती / गणना करावी / कोणी किती -१३५६-
गदा फिरवीत / गेला दुर्योधन / तळ्याचे कांठाशी / पदलासा -१३५७-
युद्धाचा निकाल / लागल्यासारखी / स्थिती ती वाटली / संजयास -१३५८-
म्हणूनी निघाला / हस्तिनापुरास / राजांना वृत्तांत / देण्यासाठी -१३५९-
दुर्योधन करी / तयास सूचना / पाण्याचे जवळी / ढकलण्या -१३६०-
दुर्योधन जो कां / पाण्यांत शिरला / मोहिनीच केली / पाण्यावर -१३६१-
पाणी तें जाहलें / निर्मळ नि संथ / नाही कोणी जणूं / पाण्यामधे -१३६२-
कृप कृतवर्मा / आणि अश्वत्थामा / आले तिकडेच / त्याचवेळीं -१३६३-
दुर्योधनालागीं / साद देवूनीया / म्हणे अश्वत्थामा / अजूनही -१३६४-
चौघे मिळूनिया / निकराची झुंज / देणें आहे शक्य / काय मत -१३६५-
पाण्याखालूनच / दुर्योधन म्हणे / थकलो आहे मी / आज तरी -१३६६-
उत्तर ऐकूनी / तीघांचे त्रिकूट / राहुटयांत मग / परतले -१३६७-
भीमाचे करितां / शिकार आणणें / काम नेमलेले / भिल्लाना ज्या -१३६८-
त्यांनी ऐकलेला / संवाद तो सारा / भीमास खबर / त्यांनी दिली -१३६९-

सकाळी सकाळी / पांडव नि कृष्ण / पोंचले तिथे त्या / तळ्याकांठी -१३७०-
आवाज देऊन / भीमानें म्हटलें / लपून राहणें / दुर्योधना -१३७१-
नव्हे क्षात्रधर्म / चल ये बाहेरी / दुर्योधन तेव्हां / उत्तरला -१३७२-
केवळ दोघांचे / होईल कां द्वंद्व / वचन मजला / द्यावें आधी -१३७३-
वाचन मिळता / आला तो बाहेर / पवित्रा घेऊन / सज्ज झाले -१३७४-
दुर्योधन म्हणे / याच क्षणासाठी / सराव कितीक / मी ना केला -१३७५-
बनवून तुझा / लोखंडी पुतळा / त्यावरी प्रहार / किती केले -१३७६-
इतुक्यांत तिथे / आले बलराम / म्हणती योग्य ही / जागा नव्हे -१३७७-
ठार खडकाळ / जागेस नेऊनी / दोघांना पवित्रा / देते झाले -१३७८-
दोघे तुल्यबळ / गदाधारी योद्धे / तयांचे तें द्वंद्व / भयावह -१३७९-
दोन वाघ जणूं / समोरा समोर / मोका साधण्यास / आसुसले -१३८०-
प्रहार जोराचे / भीमावर आले / शिताफीने त्याने / चुकवले -१३८१-
दुर्योधनाच्या जे / खांद्यावर आले / भीमाचे प्रहार / गदा परि -१३८२-
चेंडू आपटावा / दगडावरती / तैसीच उडते / दरवेळी -१३८३-
श्रीकृष्णांनी तेव्हां / शड्डू मारूनीया / संकेत भीमास / कांही दिला -१३८४-
दुर्योधनाच्या कीं / मांडीवर नेम / साधला भीमाने / जोरदार -१३८५-
बलरामांना तें / नाही झाले मान्य / भीमाची गदाच / उडविली -१३८६-
परि दुर्योधन / गुरूस बोलला / मांडीच पिचली / माझी पहा -१३८७-
नाही उठणेंही / मज आतां शक्य / द्वंद्वास इथें कां / आणियेलें -१३८८-
बलरामांनी तें / केलें निरसन / आहे या जागेचा / इतिहास -१३८९-
कुरुवंशाचा जो / प्रथम पुरुष / होता तो नांगर / चालवीत -१३९०-
इंद्राने तयास / प्रश्न विचारीला / खडकांत कां रे / नांगरतो -१३९१-
पुरुषाने तेव्हां / उत्तर दिधलें / युद्धेही होतील / भविष्यात -१३९२-
या जागी जे योद्धे / युद्ध लढतील / लाभेल तयांस / स्वर्गवास -१३९३-
नांगरट नव्हे / ही तो मशागत / स्वर्ग त्यांना लाभो / म्हणोनिया -१३९४-
संवाद तैसा तो / जरी चाललेला / भीम तरी होता / उद्वेगात -१३९५-
याच मांडीवर / द्रौपदीस घ्यावें / होती ना दुष्ट ती / तुझी इच्छा -१३९६-
हीच तुझी मांडी / कुटायची होती / माझेही मनांत / तीव्र ईर्षा -१३९७-
श्रीकृष्ण म्हणाले / अन्यायी हव्यास / सारे राज्य तुला / हवे होते -१३९८-
किती अतिरथी / आणि महारथी / युद्धात खपले / तुझ्यामुळे -१३९९-
तेथेच सोडोनी / त्याला खितपत / निघोनीया गेले / मग सारे -१४००-

**(५६)**

कृष्ण पांडवांना / म्हणाले निवांत / वाटेल ऐशाच / जागी जाऊं -१४०१-
नदीचे किनारी / चक्कर मारून / आसरा वाटेल / तिथें पडूं -१४०२-
भीम-दुर्योधन / द्वंद्वाचा वृत्तांत / कृपांना दिधला / संजयाने -१४०३-

कृपाचार्य तेव्हां / दुर्योधनाकडे / गेले त्यांना म्हणे / दुर्योधन -१४०४-
सहसंवेदना / सांगण्यास तुम्ही / आलात केलेत / उपकार -१४०५-
माझ्या ह्या स्थितीत / आठवते मज / गोष्ट एक कधी / ऐकलेली -१४०६-
मानव स्वच्छंदी / फिरायाचे कधी / नव्हती संगत / स्त्रीची जेव्हां -१४०७-
स्त्रीच्या संगतीने / प्रजा खूप झाली / कारण सर्वच / अमरही -१४०८-
भार पेलवेना / पृथ्वीस म्हणोनी / निर्मिले अग्नीस / ब्रह्माजीनी -१४०९-
त्यांना शिवजींनी / विनवीले नका / स्वतःची निर्मिती / नष्ट करूं -१४१०-
मग ब्रह्माजीनी / एक स्त्री निर्मिली / काळी कभिन्नशी / लाल डोळे -१४११-
तिला काम दिले / जीव नसावेत / अमर तिने तें / नाकारले -१४१२-
ब्रह्माजीनी तेव्हां / मद मोह दंभ / लोभ क्रोध आणि / मत्सरही -१४१३-
आणि रोगराई / लागण साऱ्यांची / करूनी मृत्यूची / सोय केली -१४१४-
व्यवस्था हि ठीक / म्हणूनी शिवांनी / उत्थित पाऊल / उतरले -१४१५-
आणिक नर्तन / त्यांनी सुरू केले / नेहमीप्रमाणें / तालबद्ध -१४१६-
दुर्योधन म्हणे / मर्म या गोष्टीचे / समजतां येते / दुःखमुक्ती -१४१७-
पावलो ही स्थिती / अंतिम समयी / जीवन जगूनी / अहंमन्य -१४१८-
तरीही निरिच्छ / स्थितीत मरण / आल्यास पावेन / स्वर्गवास -१४१९-
अश्वत्थामा पुसे / ठीक बोललास / परंतु आमचे / काय आतां -१४२०-
मनातील बोच / काढण्यास मला / बनूं दे सेनानी / कौरवांचा -१४२१-
संमती घेऊन / बनली कि सेना / कृत कृपवर्मा / अश्वत्थामा -१४२२-
(५७)
रात्री उशीराने / पोंचले कुठल्या / तंबूत परि ना / डोळां झोप -१४२३-
कृपांनी पुसिले / झोप नाही येत / अस्वस्थ असतां / येते काय -१४२४-
द्रोणांच्या हत्येचे / कांही अंशी तरी / पारिपत्य व्हावें / मनी आहे -१४२५-
तीघेही पोंचले / पांडवांचे जेथें / शिल्लक सैनिक / झोपलेले -१४२६-
कपाळावरील / नीलमण्याच्या त्या / उजेडी शोधीला / धृष्टद्युम्न -१४२७-
दासींना सारून / खंजीराने उभा / चिरला हत्यारा / आचार्यांचा -१४२८-
शिखंडीच्या सुद्धा / राहुटीत त्यानें / तसाच प्रकार / पुन्हां केला -१४२९-
नंतर घेतला / साऱ्या पांचालांचा / समाचार त्याच / त्वेषामध्ये -१४३०-
कृप कृतवर्मा / यांनी मिळूनिया / पेटवूनि दिलें / दल सारे -१४३१-
धगीतून वाट / काढीत तीघेही / भेटले पुनश्च / एकमेकां -१४३२-
पांडव कुठेच / नाही ना दिसले / एकही भेटला / नाही कैसा -१४३३-
तेव्हां परतले / दुर्योधनाकडे / वृत्तांत ऐकूनी / उद्विग्नसा -१४३४-
म्हणे दुर्योधन / तुम्ही कां मारिले / निष्पाप निःशस्त्र / सैनिकांना -१४३५-
माझ्या वतीने हें / कृत्य करूनीया / मलाही पापाचे / धनी केलें -१४३६-
आणखी कांहीही / आपण करावें / अनुज्ञा ती होणें / नाही शक्य -१४३७-

युद्ध हें संपलें / निघा तुम्ही आतां / भोगेन मरण / माझे मीच -१४३८-
संजय नंतर / राजांना म्हणाला / अखेरचे आहे / सांगायाचें -१४३९-
दुर्योधनास मी / भेटलो नंतर / पूर्ण थकलेला / होता तो कीं -१४४०-
आधार मी दिला / माझे मांडीवर / अखेरचा श्वास / तोंच झाला -१४४१-
तेव्हां धृतराष्ट्र / बोलले तयास / जाहलो मी काय / निर्विकार -१४४२-
वडील मुलाच्या / मृत्यूचीही वार्ता / ऐकूनही कैसा / अविचल -१४४३-
दुर्योधन होता / जिद्दी त्याला सदा / होती खुमखुमी / लढायाची -१४४४-
भांडण छिडता / क्रोधाने विवेक / व्हावयाचा भ्रष्ट / लगेचच -१४४५-
तरी त्याला वाटे / सर्व समजते / तशाच भ्रमात / राहायचा -१४४६-
सहकारी आणि / सारे सल्लागार / तेही सगळेच / अविवेकी -१४४७-
अखेरी होईल / काय परिणाम / बूज नव्हतीच / कुणालाही -१४४८-

**(५८)**

राजा जन्मेजय / पुसता जाहला / वैशंपायनांना / साहजिक -१४४९-
कृप कृतवर्मा / आणि अश्वत्थामा / यांचे पुढे काय / जाहलें कीं -१४५०-
कृतवर्मा गेला / द्वारकेस कृप / दूरच्या वाटेने / परतले -१४५१-
अश्वत्थामा तरी / उद्विग्न विषण्ण / फिरत असतो / नदीकांठी -१४५२-
धृष्टद्युम्नाचा जो / रथाचा सारथी / वांचलेला होता / दैवयोगें -१४५३-
त्याने पांडवांना / सारे सांगीतले / कौरवत्रयीने / काय केलें -१४५४-
त्याने पांडवांना / वृत्तांत देतांना / कृष्ण ओरडले / भीम कोठे -१४५५-
सात्यकीस रथ / जोडण्या सांगून / साथीस घेतले / अर्जुनास -१४५६-
म्हणाले एकदा / अश्वत्थाम्यासवें / चाललेल्या होत्या / गप्पा तेव्हां -१४५७-
प्रस्ताव बोलला / अदलाबदल / सुदर्शन आणि / ब्रह्मास्त्राची -१४५८-
ब्रह्मास्त्राचा मंत्र / आचार्यांनी फक्त / तुला आणि त्याला / दिला काय -१४५९-
प्रस्ताव प्रथम / वाटला मजेचा / हट्ट मग त्याने / जणूं केला -१४६०-
समजाविले मी / आजवरी नाही / कोणीच मागणी / ऐसी केली -१४६१-
बलराम तरी / नांगर नि गदा / तेवढ्याने होता / समाधानी -१४६२-
तरीही समोर / वाळूत ठेवले / सुदर्शन चक्र / त्याचेसाठी -१४६३-
परी त्याच्याने तें / नाही पेलवले / वरती मजला / म्हणे कैसा -१४६४-
एका बोटावर / कैसे तूं तरी हें / इतुके सहज / फिरवतो -१४६५-
अदलाबदल / नाहीच जाहली / ब्रह्मास्त्राचा योग / नाही आला -१४६६-
आता अश्वत्थामा / हताश स्थितीत / कांहीही करेल / भीती मज -१४६७-
त्याच्याच मागें हा / गेला वेडा भीम / नदीकांठी हवें / पोंचायला -१४६८-
समोर पाहती / अश्वत्थाम्यानें कीं / भीमाची गदाच / हिरावली -१४६९-
दुसरे हातात / दर्भाची काडीच / घेऊनी करीतो / पुटपुट -१४७०-
कृष्णांनी जाणीला / संकल्प तो त्याचा / पांडवांचा नाश / होवो ऐसा -१४७१-

मंत्रसिद्ध दर्भ / हवेंत फेकला / त्याचवेळी बाण / अर्जुनाचा -१४७२-
तोही मंत्रसिद्ध / दर्भास भिडेल / साद देत आले / व्यास तेथे -१४७३-
अश्वत्थामा तुझे / रोकले ब्रह्मास्त्र / अर्जुना तुझेही / रोक पाहूं -१४७४-
आतां परतवा / आपापली अस्त्रें / अश्वत्थामा म्हणे / काय करूं -१४७५-
तैसा मंत्रविधी / मला न ठाऊक / व्यासांनी म्हटलें / ठीक आहे -१४७६-
अर्जुनास तरी / तेंही ज्ञात होते / ब्रह्मास्त्रही कैसे / परतावे -१४७७-
त्याच्या नि व्यासांच्या / मंत्रसामर्थ्याने / हवेंत विरले / दर्भ बाण -१४७७-
झाल्या प्रकाराची / क्षमा मागण्यास / व्यासांचे समोर / अश्वत्थामा -१४७८-
ऐसेही म्हणाला / वाटतें रहावें / जनसामान्य वा / अज्ञात वा -१४७९-
परंतु माथीच्या / नीलमण्यांमुळे / सामान्य राहणें / कैसे शक्य -१४८०-
माहीतही नाही / असें हें वैशिष्ट्य / कोण्या कारणानें / मज आलें -१४८१-
व्यासांनी हंसून / म्हटलें सर्वच / गोष्टींना असतें / कारण गा -१४८२-
तुझीया मातेच्या / मनी सदा असे / अनाहूत भीती / विचित्रशी -१४८३-
हरवेल काय / माझा बाळ कधी / व्रत तपें तिनें / खूप केली -१४८४-
प्रसन्न होऊनी / शंकरांनी त्यांच्या / कंठस्थ नागाचे / मण्याच्याच -१४८५-
तेजाचा सूक्ष्मसा / अंश गर्भाशयी / तुझे भाळी केला / विरूपित -१४८६-
शक्य असल्यास / आता तें निस्तेज / करावें प्रार्थितो / आर्ततेने -१४८७-
निस्तेज करणें / तें तों नाही शक्य / उपाय मणीच / काढण्याचा -१४८८-
परंतु जखम / वाहत राहील / त्रास न होईल / तुला त्याचा -१४८९-
तूंच ठरवावें / जखम कीं मणी / दोहोंपैकी काय / तुज हवें -१४९०-
अल्गदशी कांही / शल्यक्रिया झाली / शांत शांत झाला / अश्वत्थामा -१४९१-
निरोप घेऊनी / गेला अश्वत्थामा / कृष्णांनी म्हटले / अर्जुनास -१४९२-
अश्वत्थाम्याच्या ना / अस्त्राचा हलका / अभिमन्यूसही / ताप झाला -१४९३-
पूनर्जन्म त्यास / आहे लाभलेला / उत्तरेच्याच गा / गर्भामध्ये -१४९४-
जन्मेल तो पहा / राजा परीक्षित / पुढती चालेल / राजवंश -१४९५-

**(५९)**

राजवाड्यामधे / विदुरांचा होता / चालला संवाद / राजासवें -१४९६-
आपुली दुःखे ना / फलिते असती / जीवनक्रमांची / आपुल्याच -१४९७-
दुःखांचाच जरी / विचार करावा / कारणें अनेक / विलापास -१४९८-
शोकच वाढत / राहिल्यास कधी / मनास मिळेल / शांती काय -१४९९-
तुझी वाणी आहे / अमृत विदुरा / तरीही वाटते / एक वेळ -१५००-
कुरुक्षेत्रावरी / जाऊंनिया यावें / संजयाने रथ / जुंपीयेला -१५०१-
तेथे तरी होती / प्रेते पडलेली / इकडे तिकडे / अस्ताव्यस्त -१५०२-
त्यातून काढीत / वाट संजयाने / धरिले नाकाशी / वस्त्र कांही -१५०३-
राजांना म्हणाला / आपुलें अंधत्व / वाटते यावेळी / सौभाग्यचि -१५०४-

राजवाड्यामध्ये / परतल्यावर / गांधारीही आली / कुंतीसवें -१५०५-
युयुत्सू होताच / राजांनी म्हटले / पांडवांना घेई / बोलावूनि -१५०६-
पांडव द्रौपदी / श्रीकृष्णही आले / बोलले धर्मास / धृतराष्ट्र -१५०७-
तुम्हीच आहात / आता माझी मुलें / आहेत ना साथ / भाऊ तुझे -१५०८-
हो हो म्हणतांना / कृष्णांनी सावध / रोकले भीमास / लगेचच -१५०९-
दुर्योधनाने जो / होता बनविला / लोखंडी पुतळा / पुढें केला -१५१०-
धृतराष्ट्राने ना / मिठी मारियेली / कडकडूनशी / पुतळ्यास -१५११-
लोखंडी पुतळा / झाला चेंदामेंदा / राजेही स्वतःही / चमकले -१५१२-
संजया भीमास / इजा झाली काय / नाही श्रीकृष्णांनी / वांचवीले -१५१३-
आपुला आवेग / जाणूनी वेळीच / पुतळा समोर / केला होता -१५१४-
महाराज व्हावें / आतां तुम्ही शांत / कृष्णांनी प्रसंग / सांवरला -१५१५-
भीमावर सुद्धा / आपुले प्रेमच / आहे खात्री द्यावी / त्याची आतां -१५१६-
राजांनी म्हटले / कृष्णा धन्यवाद / जवळी ये भीमा / नको भिऊं -१५१७-
द्रौपदीस कांहीं / कुतूहल होतें / गांधारीचे डोळां / तेज कैसे -१५१८-
असें तिच्या मनीं / येतांनाच पहा / पट्टी ढिली झाली / थोडीशीच -१५१९-
तिरपी नजर / धर्माचे पायाचे / अंगठ्यावरती / पडली कीं -१५२०-
चटका बसला / कळ कीं उठली / प्रताप कळला / नजरेचा -१५२१-
गांधारीने तरी / सहजी पुसीले / कुंतीसवें भेट / केली कीं ना -१५२२-
युद्धभूमीवरी / साऱ्या मृतदेहां / अग्नि द्यावयाचें / मोठे काम -१५२३-
युयुत्सू सात्यकी / यांनी मिळूनिया / धैर्याने नेटाने / पुरें केलें -१५२४-

**(६०)**

पांडव आलेले / कृष्णास भेटण्या / सकाळीं सकाळीं / तेव्हां त्यांना -१५२५-
म्हटलें कृष्णांनी / शरशय्येवरी / माझेच चिंतनी / पितामह -१५२६-
चला जाऊं त्यांना / भेटले पाहिजे / धृतराष्ट्र सुद्धा / साथ आले -१५२७-
युयुत्सू सात्यकी / व्यास नि विदुर / संजय नि कृप / सारे आले -१५२८-
सर्वांनी भीष्मांना / प्रदक्षिणा केली / धर्माने टेकला / पायी माथा -१५२९-
भीष्मांनी म्हटले / समोर ये राजा / वाटतो संकोच / धर्म म्हणे -१५३०-
बोल लावाल कीं / ऐसे मनीं येतें / नाही रे तूं तरी / लाडका ना -१५३१-
शिवाय सदैव / न्यायाने धर्माने / वागतोस तुला / बोल कैसा -१५३२-
म्हणती जळत्या / चितेच्या धुराचा / जर कोणा गंध / जाणवेल -१५३३-
आठवडाभर / तरी जगतात / त्याहून नजीक / माझी वेळ -१५३४-
पांडव तुम्ही तो / देवतांचे अंश / शांतता नि न्याय / नांदविण्या -१५३५-
पृथ्वीवरी तुम्ही / याल वारंवार / मान राहीलसे / वागा सदा -१५३६-
ऐसे म्हणूनियां / साऱ्या पांडवांच्या / मस्तकास केलें / अवघ्राण -१५३७-
बालपणीं सुद्धा / ऐसे अवघ्राण / करायाचे सदा / कौतुकाने -१५३८-

भीष्मांनी नंतर / कृष्णांकडे हात / जोडूनियां डोळे / मिटलेनी -१५३९-
सहदेवासही / ध्यानीं आले क्षणीं / उत्तरायण कीं / सुरू झालें -१५४०-
युधिष्ठिर गेला / भीष्मांचे जवळीं / जरी माझे बोल / ऐकतासे -१५४१-
अंतिम इच्छेची / करावीत आज्ञा / भीष्मांनी कृष्णांना / खूण केली -१५४२-
ह्यांना सांगावेसे / वाटते जिथे तूं / सत्य कीं जाणावें / तिथें सदा -१५४३-
आणि जें कां सत्य / त्याचाच विजय / होईल सर्वथा / नेम खरा -१५४४-
आतां मज द्यावा / निरोप श्रीकृष्णा / तथास्तु म्हटले / श्रीकृष्णांनी -१५४५-
व्यासांनी रचिली / चिता त्यांचेसाठी / धर्मास म्हटले / देई अग्नी -१५४६-
जेव्हां त्यांच्या अस्थि / गंगार्पण केल्या / वेग आंवरेना / गंगेसही -१५४७-

(६१)

जड पावलांनी / तेथून निघतां / युधिष्ठिरा आली / भोंवळशी -१५४८-
बाजूलाच होता / भीम त्यानें त्याला / आधार देऊनी / सांवरलें -१५४९-
विमनस्कपणे / बडबड कांही / करून राहीला / युधिष्ठिर -१५५०-
खरे सुखी लोक / ठार वेडे किंवा / ज्यांनी मनावर / काबू केला -१५५१-
असें कांहीं होता / म्हणत तोंवर / स्वप्न पाहिले कीं / ग्लानीतच -१५५२-
द्रौपदी आणिक / पांचही पांडव / चढत निघाले / हिमालय -१५५३-
अरुंद वाटेत / अडखळल्याने / द्रौपदी पडली / दरीमध्ये -१५५४-
नकुल थांबला / खूप थकलेला / सहदेव सुद्धा / त्याचेसह -१५५५-
परस्परां मिठी / मारूनीया दोघे / तैसेच जाहले / गतप्राण -१५५६-
अर्जुनही गेला / नंतर भीमही / एक कुत्रा मात्र / धर्मासवें -१५५७-
स्वर्गाचे दारांत / पोहोचले दोघे / इंद्राचा रथही / तेथें आला -१५५८-
मातालीस तेव्हां / धर्माने म्हटलें / चारी भाऊ आणि / द्रौपदीही -१५५९-
हक्कदार खरे / स्वर्गाचे आहेत / आधीच पोंचले / आहेत ते -१५६०-
श्वानाने ह्या मज / साथ इथवर / दिल्याने त्यालाही / न्याया हवें -१५६१-
इतुक्यांत तेथे / देवेंद्र स्वतःच / दाखल जाहले / म्हणाले कीं -१५६२-
श्वानासम ऐशा / कोणत्या प्राण्यास / नसतो प्रवेश / स्वर्गामध्ये -१५६३-
थांबा मी अजून / माझेच राज्याचे / हद्दीत आहे ना / तरी मग -१५६४-
मी जे कां म्हणेन / तैसेच होईल / कोणी मजकडे / आल्यास कीं -१५६५-
भीतीनें अथवा / संकटाकारणें / अथवा केवळ / मैत्रीसाठी -१५६६-
त्याला मी नाहीच / परतवणार / इंद्राने सूचना / एक केली -१५६७-
श्वानास मी गुंगी / दिल्यास कोणास / वैषम्य कांहीच / राहील ना -१५६८-
धर्माने म्हटलें / माफ कर इंद्रा / मज नाही मान्य / पळवाटा -१५६९-
ऐसेंनी म्हणत / वळून पाहतां / श्वानाजागीं होते / यम स्वतः -१५७०-
शाब्बास रे पुत्रा / श्वान होऊनियां / तुझ्यासवें होतो / साथ साथ -१५७१-
तुझी भूतदया / आणि न्यायनिष्ठा / खऱ्या बिनतोड / सर्वकाळ -१५७२-

स्वर्गप्राप्तीच्याही / क्षणी तूं मुळीच / न्यायाची ना कास / सोडलीस -१५७३-
स्वतः वडिलांनी / केलेले कौतुक / जाणूनी धर्मास / जाग आली -१५७४-

(६२)

शुभ दिवसास / पांचही पांडव / पहाटेच आले / मंदिरास -१५७५-
ग्रामदेवतेचे / करून दर्शन / मिरवणुकीने / दरबारीं -१५७६-
राज्याभिषेकास / मोठा ब्रह्मवृंद / सर्वदुरूनही / आला होता -१५७७-
ब्रह्मवृंदामधे / ब्राह्मण वेषात / चर्वाक राक्षस / शिरलेला -१५७८-
धर्माने वंदन / ब्रह्मवृंदाप्रत / केल्यावर सुरूं / मंत्रघोष -१५७९-
होणार तेव्हांच / चर्वाकाने दिला / आवाज म्हणाला / हत्यारा तूं -१५८०-
किती कुरुवंश / तुझ्यामुळें रणीं / गारद जाहला / राजा कैसा -१५८१-
राज्याभिषेकास / नाहीस तूं पात्र / आधी प्रायश्चित्त / व्हाया हवें -१५८२-
प्रायश्चित्त तरी / देहान्तच मात्र / तेंच धर्मशास्त्रीं / म्हटलेले -१५८३-
आधी झाला नाही / पुढे न होईल / ऐसा सर्वश्रेष्ठ / राजा मीच -१५८४-
ब्राह्मणा शास्त्रांत / आहे ना म्हटले / आत्मस्तुती तीही / आत्महत्या -१५८५-
आणिक राजाचा / अपमान झाला / तेंही मरणच / राजासाठी -१५८६-
तैसेच मरण / तुवां मज दिलें / दोनदां देहान्त / झाला माझा -१५८७-
प्रायश्चित्त ऐसे / जाहलेसे सिद्‌ध / राज्याभिषेकास / पात्र आतां -१५८८-
रत्नजडित त्या / सिँहासनावर / आरूढ जाहला / युधिष्ठिर -१५८९-
स्वतः धृतराष्ट्र / यांनी चढवीला / धर्मास मुकुट / साभिषेक -१५९०-
प्रथम कुरूचे / वेळेपासूनीयां / तेवत होते जे / अग्निहोत्र -१५९१-
कुलज्योतीस त्या / धर्माने वाहीला / घृतसंस्कारही / समिधेने -१५९२-
जनतेस मग / आवाहनपर / भाषणात दिली / जाणीव कीं -१५९४-
सिंहासनावरी / जरी मी आरूढ / खरे कुरुश्रेष्ठ / धृतराष्ट्र -१५९५-
तरी त्यांचा मान / राखला पाहीजे / राजगृही आणि / जनतेने -१५९६-

(६३)

कथा पुढें नेतां / वैशंपायनांनी / जनमेजयास / सांगितलें -१५९७-
आपुले पिताश्री / परीक्षित यांचा / जन्म जेव्हां झाला / निर्जीव ते -१५९८-
अश्वत्थाम्याच्या त्या / ब्रह्मास्त्राचा कांही / प्रभाव झाल्यानें / तैसे झाले -१५९९-
द्रौपदी सुभद्रा / दोघीही मिळून / श्रीकृष्णास हांक / देत्या झाल्या -१६००-
श्रीकृष्णांना झाली / संवेदना त्यांनी / प्रतिसंवेदना / तेव्हां दिली -१६०१-
राजगृही झाला / आनंदीआनंद / सोहळा सजला / पक्षभर -१६०२-
युधिष्ठिराहस्ते / दानें खूप झाली / अन्न वस्त्र आणि / इतरही -१६०३-
अखेरच्या दिनी / भोजनगृहात / मुंगुसाने केली / लुडबुड -१६०४-
त्याच्या शरीराचा / अर्धा भाग मात्र / सोनेरी झालेला / विचित्रचि -१६०५-
धर्माचे दृष्टीस / येताच उसासा / टाकलासा जणूं / मुंगुसानें -१६०६-

धर्माने पुसिले / मुंगुसास तेव्हां / कारण उसासा / टाकण्यास -१६०७-
मुंगूस म्हणाला / जेथे दानछत्रे / चालतात तेथें / जातोच मी -१६०८-
आपुल्याबद्दल / खूप ऐकल्याने / अपेक्षा धरून / इथें आलों -१६०९-
परंतु मजला / खूप वर्षांपूर्वी / पसाभर भात / मिळालेला -१६१०-
त्याची सर नाहीं / आजवर आली / कोठेही नाहीच / इथें सुद्धा -१६११-
तुझे कीं शरीर / अर्धेच सोनेरी / संबंध कांही कां / निराशेशी -१६१२-
योग्यच हेरले / हजारेक वर्षें / झाली त्या गोष्टीला / काय सांगूं -१६१३-
तेव्हांपासूनीया / त्याच त्या बिळांत / आजतागायत / राहतो मी -१६१४-
एकदा इतका / दुष्काळ पडला / अन्नान्न जाहली / सारी प्रजा -१६१५-
ख्याती ज्या घराची / अन्नाची वानवा / कधी नाही झाली / तिथे सुद्धा -१६१६-
वाटगाभरच / धान्य उरलेले / तशात पांथस्थ / कोणी आला -१६१७-
आनंद जाहला / यजमानां परि / पांथस्थ म्हणाला / आडोसच -१६१८-
हवा होता आणि / कोणी न दिसलें / म्हणूनियां आलों / इतुकेच -१६१९-
यजमान म्हणे / सौभाग्य आमुचे / अतिथीसेवेनें / होऊं धन्य -१६२०-
दोन घास घ्यावे / खाऊनीया ऐसा / आग्रह करिती / यजमान -१६२१-
घरोघरी तरी / भुकेचा कहर / माजला असतां / आतिथ्य हें -१६२२-
पांथस्थास भीड / वाटूनि नकार / बोलला परंतु / यजमान -१६२४-
मानेचिना म्हणे / असते आमचे / धान्याचे कांहीसे / नियोजन -१६२५-
यंदाचा दुष्काळ / आहे मात्र तीव्र / तरीही टळेल / हीही वेळ -१६२६-
नेले अतिथीला / भोजनगृहात / वाढाया आणिले / म्हातारीनें -१६२७-
वाटगाभरच / भात तो संपला / अंगणात हात / धुतलेन -१६२८-
अतिथीचे संगें / सांवली नव्हती / अतिथी नव्हेच / यम स्वतः -१६२९-
यजमानास ते / म्हणाले भुकेनें / धैर्य कीं सुटते / विवेकही -१६३०-
तुम्ही तर मात / भुकेवरतीच / केलीसे पाहून / धन्य झालों -१६३१-
तुम्हां पाचारण / कराया स्वर्गात / मज धाडीयेलें / ब्रह्माजींनी -१६३२-
यमांनी धुतले / हात जिथे होते / कांही कण तेथे / पडलेले -१६३३-
त्याच कणांमध्ये / लोळण घेतली / तेवढेच अंग / सोनेरी ना -१६३४-
तुवां पाहिलेल्या / दानाची त्या सर / येईल ऐसा ना / भ्रम मज -१६३५-
माझ्या तर्फे थोडे / अंडे आणि दूध / घ्यावे नि तुकडा / रेशमाचा -१६३६-
भेट म्हणूनिया / पत्नीस तो द्यावा / मुंगूस म्हणाला / धन्यवाद -१६३७-
खरे तर मीच / धन्य पहा झालों / हृद्य आपुला हा / अनुभव -१६३८-

**(६४)**

धर्मास एकदा / कुरुकुलनीती / म्हणूनी बोलले / धृतराष्ट्र -१६३९-
निवृत्त झालेल्या / राजानें योजावें / अखेरचा श्वास / रणांगणी -१६४०-
किंवा वनवासी / घ्यावा ऐसा आहे / कुलधर्म त्याचे / पालनास -१६४१-

आतुरले आहे / आतां माझे मन / कानीं आहे तेंच / घालायाचे -१६४२-
वृत्त पसरले / हस्तिनापुरात / धृतराष्ट्रांच्या त्या / योजनेचे -१६४३-
प्रजा जमलेली / प्रासादाभोवती / तिला संबोधिती / धृतराष्ट्र -१६४४-
राज्यकारभार / धर्माने चांगला / सांभाळला आहे / सुखी राहा -१६४५-
राजा मी असतां / सर्वांच्या प्रेमाचा / आधार लाभला / खूप मोठा -१६४६-
वानप्रस्थासाठी / करीतो प्रस्थान / लोभ असू द्यावा / सर्वकाळ -१६४७-
संजय विदुर / गांधारीचे संगे / वनास निघाले / धृतराष्ट्र -१६४८-
गांधारीचा हात / धरूनीया कुंती / तशीच निघाली / पुढे तेव्हां -१६४९-
धर्मास म्हणाली / द्रौपदीस आणि / साऱ्या भावंडांना / सांभाळी गा -१६५०-
काय भलतेंच / आपणही कोठें / निघालात माते / धर्म पुसें -१६५१-
पांडू महाराज / आणि माद्रीसवें / वनवासाचा ना / अनुभव -१६५२-
मज असल्याने / गांधारीस आणि / इतर सर्वांना / संभाळाया -१६५३-
मीच साथ जाणें / तेंच योग्य आहे / भावनाविवश / नका होऊं -१६५४-
कृप नि युयुत्सू / वेशीचे पर्यंत / निरोप देण्यास / गेले होते -१६५५-
गंगा नदीवर / मंडळी पोंचली / काठानें चालत / कुरुक्षेत्री -१६५६-
आली तेव्हां तेथें / व्यासांनी दिधला / सर्वांना प्रेमानें / आशीर्वाद -१६५७-

**(६५)**

अधून मधून / येई युधिष्ठिर / सर्वच ज्येष्ठांना / भेटण्यास -१६५८-
एकदा भेटले / नदीचे काठीच / कुंती गांधारी नि / धृतराष्ट्र -१६५९-
पाण्याच्या घागरी / स्वतःच कि त्याने / कुटीत नेऊनी / पोंचविल्या -१६६०-
विदुर दिसत / नाहीत पुसतां / खुलासा करिती / धृतराष्ट्र -१६६१-
हवा खाऊनच / जगतो तो जणूं / संवाद नसतो / मौनामुळें -१६६२-
फिरत तो जातो / कुठेही कधीही / भेटेल तो कोठे / सांगूं कैसे -१६६३-
सांगितल्या होत्या / विदुराने तीन / मार्मिकशा गोष्टी / स्मरतात -१६६४-
सर्वच प्राण्यांशी / हवी भूतदया / बोलतांना हवें / व्यवधान -१६६५-
सत्यच बोलावें / नसावें पाल्हाळ / सतर्कता हवी / धैर्यासही -१६६६-
तीनही गोष्टींचे / मनन करीत / वनामध्ये गेले / युधिष्ठिर -१६६७-
एकांतशा स्थळीं / विदुर दिसले / दृष्टादृष्ट झाली / एकमेकां -१६६८-
अनाहूतपणे / विदुरांचा आत्मा / युधिष्ठिर-देही / प्रवेशला -१६६९-
खूप वेळ झाला / युधिष्ठिर कोठें / गेला रे संजया / विचारतां -१६७०-
पाहतो म्हणत / बाहेर पडतां / दिसले समोर / व्यास स्वतः -१६७१-
म्हणाले पार्थिव / विदुराचे ठेवा / जेथे जैसे आहे / तैसे तेथे -१६७२-
युधिष्ठिर आहे / जोंवर जीवंत / दंडक विधान / पाळावे हें -१६७३-
विदुर नि धर्म / दोन देह तरी / एकाच आत्म्याची / दोन रूपें -१६७४-

**(६६)**

संजय एकदा / पाणी आणण्यास / गेलेला असतां / नदीकांठी -१६७५-
पर्णकुटीतील / पणती पडली / आगीचा भडका / उडालेला -१६७६-
कुंती नि गांधारी / आणि धृतराष्ट्र / तीघेही आगीत / अडकले -१६७७-
कोणासही परि / नाहीच वाटले / यावे ना बाहेर / आगीतून -१६७८-
सुभद्रेने केली / इच्छा कीं प्रकट / द्वारकेस जाण्या / कृष्णांकडे -१६७९-
वेशीजवळच / भेटले श्रीकृष्ण / माझा रथ मी ना / ठेवलेला -१६८०-
खुलासा दिधला / सुभद्रेने तेव्हां / वाटेत भेटला / मायासुर -१६८१-
त्याने केले आहे / थोडे सुशोभन / रथ परि आहे / तोच भाऊ -१६८२-
अर्जुनाची वाट / अडवूनी व्यक्ती / मृगाजीनधारी / त्यासी म्हणे -१६८३-
अक्षय भाता नि / गांडीव दिलेले / त्यांचे नाही आतां / प्रयोजन -१६८४-
अग्नीस करून / साभार वंदन / दोन्ही गोष्टी दिल्या / अर्जुनाने -१६८५-
परीक्षितालागी / राज्याभिषेकाचा / करूनी संस्कार / युधिष्ठिर -१६८६-
द्रौपदी नि साऱ्या / बंधूना घेऊन / निघाले जाण्यास / हिमालयीं -१६८७-
अपौरूषेयचि / आलेल्या प्रकृती / निजतत्त्वी काय / सामावल्या -१६८८-
ओहोटीची लाट / साऱ्या द्वारकेस / घेऊनीया गेली / सागरांत -१६८९-
परंतु त्यावेळी / कृष्ण बलराम / फिरत गेलेले / रैवतकीं -१६९०-
तिथेच शेषाने / बलरामांना ना / आपुल्या दाढेत / सामावले -१६९१-
कृष्ण बसलेले / होते झाडावर / पाय सोडूनिया / स्वस्थपणें -१६९२-
व्याधास वाटले / लालबुंद फळ / तोडण्या मारीला / बाण त्यानें -१६९३-
कृष्णांचा आंगठा / झाला होता विद्ध / अवतारकार्य / संपलेले -१६९४-
वैशंपायनांनी / जनमेजयास / कथा सांगीतली / संपलीशी -१६९५-
आस्तिकांना तेव्हां / राजाने म्हटले / यज्ञाची सांगता / हीच खरी -१६९६-
तक्षकाने मग / आस्तिकांना नेले / नदीचे तळाशीं / नागलोकी -१६९७-
सूतही म्हणाले / शौनक ऋषींना / वृक्ष नारायणीय / अव्यय ना -१६९८-
वृक्षाचे प्रत्येक / पान म्हणजे ना / कथाच असते / सुंदरशी -१६९९-
पानें सळसळ / करतात तेव्हां / संवादच कांही / असतो तो -१७००-
जणूं एकमेकां / विचारतात ती / दुसरा कोणता / डाव बरें -१७०१-
सर्वेऽत्र सुखिनः सन्तु / सर्वे सन्तु निरामयाः /
सर्वे भद्राणि पश्यन्तु / मा कश्चिद्दुःखमाप्नुयात् //
!! ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः !!

**-o-O-o-**